# प्रकरण २ रें.

## हं ! इस्पितळांत. दुसऱ्या कोठें ?

दोन दिवस गेले. त्रिंबकरावाला वाटलें, कीं आपण आतां पुण्यांत राहणेंच श्रेयस्कर नव्हे. कारण अमक्या पेठेंत म्हणजे हा रोग अजून बिलकुल झाला नाहीं असें म्हणायला जागाच नव्हती. त्यांतून त्रिंबकरावाच्या आळीला तर तो चांगल्याच वाढत्या प्रमाणावर सुरू होणार असें दिसलें. कारण त्या दोन दिवसांत अगदीं कमाल झाली. पांच पांच केसिस्‌पर्यंत आंकडा आला. दादासाहेबांनीं बाहेर बंगला घेतला, कीं आपण त्यांच्यांत घुसावयाचें असा यांचा विचार. आणि दादासाहेबांनीं तर अजून हलण्याचा विचार काढलाही नाहीं. तेव्हां आपणच हूल करावी म्हणजे ते निघतील असा मनोदय यांनीं धरला.

त्याप्रमाणें करण्यासाठीं स्वारी त्यांच्याकडे जाऊन बराच वेळ त्याबद्दल वाटाघाट करून शेवटीं दादासाहेबांना आपण तयार केले असें समाधान मनांत वाटून स्वारी जों दारांत येते, तों बायको तेथें उभी असून, " कृष्णाला मघाशीं थडथडून हिंव आलं " म्हणून सांगण्यासाठींच उभी. तें ऐकलें मात्र आणि यांना स्वतःला हुडहुडी भरण्याची वेळ येऊन ठेपली. आधीं त्याचा समाचार घेण्याचें लांबच राहून स्वारींनीं त्याजवर व बायकोवर शिव्यांच्या भडिमारास सुरुवात केली. कां ? तर त्याला गांवाला लावून द्यावा असें एकवार हे राजश्री म्हणाले होते, आणि तो गेला नाहीं. " पण नको. येथें कोणी तरी आपल्याला अडीअडचणीला उपयोगी पडेल असं पाहिजे. हा पोरगा बरा आहे " असें म्हणून आपणच त्यास जाऊं दिलें नाहीं हें त्यांच्या लक्षांत नसावें किंवा नाहीं असें त्यांनीं यावेळीं दाखविलें तरी. कृष्णास— त्रिंबकरावाच्या भाच्यास—औषधपाणी करण्याच्या ऐवजीं

त्यांना काळजी ही पडली कीं, आतां पुनः सामान नेऊन ठेवायचें कुठें आणि करायचें काय ? त्याला इस्पितळांत पाठविण्याबद्दल तर त्यांचें पक्कें ठरलेलेंच. दुसरा मार्ग काय? आणि तेंहि कोणच्या इस्पितळांत ? जनरल प्लेग इस्पितळांत ! आपण इतरांप्रमाणें नाहीं. चोरून लपवून फायदा काय ? बायकोनें बातमी सांगतांक्षणींच भरलेली हुडहुडी उतरल्याबरोबर त्यानें आपला विचार तिला कळविला. "त्याला आतां इस्पितळांत पोहोंचविला पाहिजे." हे शब्द तिनें ऐकतांच ती एकदम म्हणाली, "अहो, पण आधीं आंत येऊन पहा तरी. कसला ताप आहे, काय आहे, पोर घाबरून त्याला उगीच आंग मोडून आलं नाहीं तोंच त्याला लागलीच इस्पितळांत नेणार ? लोकं काय म्हणतील ?" "लोकांना काय होतं आहे म्हणायला ! लोकांसारखा लपवालपवी करणारा माणूस नाहीं मी. तोच ताप. त्या तापाखेरीज अशी एकदम हुडहुडी भरायचीच नाहीं. मला भय वाटलंच होतं कीं, हा कारटा त्यांच्या जागेंत फार फार जात होता, तेव्हां त्याला कांहींतरी होणार, शेवटीं झालंच. मी जाऊन आतां छकडा घेऊन येतों. वार्डांत जाऊन कळवण्यांत सुद्धां मतलब उरला नाहीं आतां. वार्डांत कळवलं कीं, या घराचा नंबर देतील, आणि पुनः इथून उठवणी होणार. शिवाय खरोखर हा कारटा लागला तिथें. तर इथला नंबर काय म्हणून द्यायचा ? चल, त्याला कांहीं खायला प्यायला घालायचं असलं तर घालून ठेव." असें म्हणून स्वारी जायला निघालीच. परंतु गंगाबाईला आतां स्वस्थ बसवेना. तो जितका घायकुत्या, तितकी ती धीराची, तो जितका निष्ठुर, तितकी ती प्रेमळ, तो जितका स्वार्थपरायण, तितकी ती परोपकारी होती. प्रत्यक्ष भाच्याला नुसता ताप आला इतकें ऐकण्याबरोबर आपला नवरा औषधपाण्याची गोष्ट न काढतां आधीं इस्पितळाकडे धांव घेईल असें तिला वाटलें नाहीं. तसें वाटलें असतें, तर तिनें त्याला इतक्या लवकर बातमी सुद्धां दिली

नसती. जितका वेळ लपवतां आलें असतें तितका वेळ लपविलें असतें. नवरा खरोखर छकडा आणायला चालला असें पहातांच तिला अतोनात वाईट वाटलें व ती एकदम त्याच्या अंगावर आल्याप्रमाणें करून म्हणते, " हें आहे तरी काय ? वन्संना कळलं म्हणजे त्या काय म्हणतील ? कांहीं धीर धरायचा आहे का नाहीं ? कोणीतरी डाक्तर आणून त्याच्याकडून तपासवून काय आहे काय नाहीं त्याचं पाहिल्याखेरीज इस्पितळ एकदम म्हणजे काय ? पाहूं बरं कोण त्याला इस्पितळांत नेतं तें ! अन् इस्पितळांत नेऊन त्याच्याबरोबर नको का कोणी जायला ? जवळ नको का कोणी बसायला ? "

" बरोबर ? बरोबर कोण कशाला पाहिजे ? त्या इस्पितळांत कोणी बरोबर लागत नाहीं. तिथें जवळ बसायला असतात. औषध द्यायला डाक्तर असतात. व्यवस्था बघायला नर्सिस असतात. आपण जाऊन काय करणार? आणखी कोण जाणार ? मी कांहीं जाणार नाहीं, आणखी तुला कांहीं जाऊं देणार नाहीं. मी छकडा आणतों. तूं असं वेड्यासारखं कांहीं करूं नकोस. हे दिवस भलत्यासलत्या प्रेमांत गुरफटून पडण्याचे नाहींत. आपल्या जीवाचा घोटाळा व्हायचा. माझा जीव कांहीं वर आला नाहीं. आणखी माझ्याकरितां तुझा जीव मला राखला पाहिजे आहे. हो, माझं आपलं खडखडीत बोलणं आहे. चल चल आटप. उगीच भलतान् सलताच गोंधळ घालीत बसूं नको. आणखी मी तुझ्या गोंधळाला मुळींच जुमानणारा माणूस नाहीं हें तुला पकं ठाऊकच आहे. मग आतां कां उगीच गडबड ? चल आटप." गंगाबाईस आपल्या नवऱ्याचा हा निष्ठुरपणा पाहून अतिशय वाईट वाटलें. परंतु अशा स्थितींत बायकांचा उपाय काय चालणार ? तिच्या डोळ्यांतून घळघळा पाणी आलें आणि नवऱ्यापुढें आपलें कांहीं चालणार नाहीं हें पक्कें ठाऊक असूनही तिच्यानें पुढें बोलवल्यावांचून राहवलें नाहीं. "नकाहो असं करूं. असा निष्ठुरपणा

करूं नका. घरांतल्या घरांत त्याला राहूं द्या. नाहीं तर त्याच्याबरोबर मी तरी जाऊन बसतें. तुम्ही नका येऊं. पण त्या चौदा वर्षांच्या पोराला एकटच्याला लावून द्यायचा इस्पितळांत! छे छे बाई, मनांत तरी कशी ही गोष्ट आली? कांहीं तरी विचार......"

"विचार? माझा मीं विचार केल्याखेरीज का बोललों तें. हे दिवस बायकांचे विचार ऐकायचे नाहींत. म्हणे घरांत राहूं द्या, आणखी उद्यां मेला म्हणजे मग जा सेग्रेगेशनांत पंधरा दिवस आणखी तुरुंगांत महिनाभर. बायकांना त्यांतलं कांहीं समजतं आहे? ह्मणे मी जातें. मी आजारी पडलों असा म्हणजे मग माझ्याबरोबर जा. त्याच्याबरोबर नको."

हिंदु स्त्रीला असले अभद्र शब्द आणि तेही नवऱ्याच्या तोंडून ऐकणें म्हणजे कोण भयंकर वाटतें! तिच्या आंगावर कसा कांटा उभा रहातो! गंगाबाईच्या कानीं ते शब्द पडतांच तिच्या सर्वांगावर शहारे आले. आतां आपण आणखी कांहीं पुढें बोललों तर असलेंच कांहीं तरी अभद्र ऐकायला सांपडणार आणखी नवरा जें काय करायचें तें करणारच, हें पक्कें जाणून ती अगदीं मुकाट्यानें बसली. काय बोलणार बिचारी! त्रिंबकराव तेथून आपल्या हेतूप्रमाणें छकडा आणण्यास गेला. तो जातां जातां ती त्याला "छकडा तरी नका आणूं, मेणा आणा" म्हणून म्हणाली—आणि "हो! मेण्याला दोन चार रुपये द्यायला वाटे-वरच पडले आहेत कीं नाहीं? रिकामाच बायकांचा......" एवढें उत्तर मात्र तिला ऐकावें लागलें.

वरील सर्व संवाद कांहीं दारांत, कांहीं अंगणांत व कांहीं ओटीवर असा झाला. अर्थातच माजघरांतल्या एका बाजूला निजविलेल्या बिचाऱ्या कृष्णाच्या कानीं त्यांतला कांहीं भाग गेला असावा अशीं गंगाबाईस शंका आली. तेव्हां ती भीतभीतच ओटीवरून माजघरांत गेली, पण माजघरांतून त्या खोलींत जाण्यास तिचा पाय वाहीना.

आपल्याला कोणी तरी सोबत आणि विरंगळा म्हणून तिनें आपल्या नणंदेच्या पाठीस लागून आज जवळजवळ दीड वर्ष झालें त्या मुलाला तिनें ठेवून घेतलें होतें. आणि नवरा जरी त्याला हिडिसफिडिस करी, तरी ती त्याला फारच प्रेमानें वागवी. तिला स्वतःला अद्यापि मूल नव्हतें—झालें नव्हतें असें नाहीं; होऊन गेलीं होतीं आणि या वेळीं ती पुनः गरोदर होती, यामुळें तिला त्याचें विशेष कौतुक वाटे. आणि तो मुलगाही तसा गुणी होता. अशा त्या मुलावर असा प्रसंग यावा, आणि तोही प्लेग सुरू होतांच त्याच्या आईबापांनीं त्याला बोलाविलें असतां आपण न पाठविल्यामुळें, हें मनांत येऊन आणि आतां नवरा त्याचें काय करणार तेंही मनांत उभें राहून तिच्या मनाची स्थिति कशी झाली असेल त्याची कल्पनासुद्धां होणें शक्य नाहीं. नवऱ्याचें मन वळविण्यास तर तिला मार्ग दिसतच नव्हता. परंतु कोणचा तरी उपाय करून त्या पोरास इस्पितळांत नेणार नाहींत असें करावें असें तिला फार फार वाटत होतें. आपण हट्ट घ्यावा. तो छकडा आला म्हणजे त्याच्यापुढें आडवें पडावें, आक्रोश करावा म्हणजे नवऱ्याचें हृदय कळवळलें तर कळवळेल असें तिला वाटलें. परंतु तशानें काय होणार ? सगळ्या आळीभर बभ्रा होऊन सरकारचे शिपाई येऊन त्याला नेणारच. तेव्हां आतां काय करावें ? त्याला तर ताप सडकून भरलेला. कोठें पळून जा म्हटलें तर जाण्याची ताकद नाहीं. अशा अनेक विवंचनेंत तिनें दहा पांच मिनिटें काढलीं. शेवटीं त्याच्याजवळ गेली तों तो अगदीं तडफड तडफड करीत आहे. ताप इतका फणाणलेला, कीं अंगाला हात लाववत नव्हता व डोळ्यांवर झांपड पडलेली. हांक मारली तर ओ द्यावी आणि कांहीं विचारलें तर अडखळल्या जिभेनें उत्तर द्यावें इतक्या बेतापुरती शुद्धि होती. बाकी तो आपल्या तंद्रींतच. तें पाहून गंगाबाईस एवढें वाटलें, कीं आपलें व आपल्या नवऱ्याचें बाहेर जें काय भाषण झालें तें कांहीं त्यानें ऐकलें

नसावें, आणि ऐकलें असलें–तें त्याच्या कानीं पडलें असलें–तरी त्याला समजलें नसावें. अत्यंत दुःखमय अशा स्थितींत कमी दुःख हेंच समाधानाला कारण असतें. पोराची शुद्ध जर मेली असली तर त्याला तरी दुःख होणार नाहीं. एवढेंच या वेळीं तिला समाधान वाटलें. एक वेळां तिला वाटलें त्याला उचलून तिसऱ्या मजल्यावर नेऊन ठेवून नवरा आला कीं त्याला "तुमचा बेत ऐकून तो पळून गेला. त्याला कांहीं तितका ताप नव्हता कांहीं नाहीं," असें सांगावें. नंतर वाटलें त्याला कोठें तरी मोठ्या फडताळांत ठेवावें अगर शेवटीं वळकटींत गुंडाळून वळकटी उभी करून ठेवावी. जितक्या म्हणून आजपर्यंत तिनें आजारी माणसें लपविण्याच्या गोष्टी ऐकल्या होत्या, तितक्या करून पहाव्या असें तिच्या मनांत आलें. आणि मन जितकें युक्त्या योजण्यांत सबळ होतें, तितकें जर शरीर सबळ असतें, तर तिनें कांहीं ना कांहीं तरी केलेंच असतें. पण शरीर तिच्या स्वाधीन सुद्धां नव्हतें आणि तितक्यांत छकड्याच्या चाकांचा तो दुष्ट आवाज तिच्या कानीं पडला व आपण काय कारणाकरितां छकडा नेतों आहोंत, त्याची पूर्ण माहिती असतांही, शेंकडों वेळ तेंच कृत्य केल्यामुळें ज्याचें मन अगदीं निढावून गेलें होतें, अशा त्या छकडेवाल्याच्या तोंडून निघालेली लावणीची भेसूर तानही तिच्या कानीं पडली. तितक्यांत त्रिंबकरावही आंत ओटीवर आला व तिला हाका मारूं लागला. आंत जाण्यास पांचचार हांका होईपर्यंत तिनें त्यास ओ दिली नाहीं. पण अखेरीस करते काय? खूपच दरडावणीनें जेव्हां पाचारण झालें व त्या छकडेवाल्यासही त्यानें आंत बोलाविलें, तेव्हां ती निमुटपणें पुढें आली. त्याबरोबर "कुठें निजवलाहेस त्याला? आण. नाहीं तर तूं नको आणूं. जा रे! ए जा. आण त्या आंतल्या पोराला. काय शिंचा सरकारचा त्रास आहे! आजारी पडलं तर सुखाचं घरांत सुद्धां राहूं देत नाहींत. जा." असें दरडावून त्यानें त्या छकडेवाल्यास सांगितलें.

त्याबरोबर "काय तात्या? तुम्हीं बामणांनींच हा तरास लावून घेतला अन् आतां कां उगच कुथता? तुम्ही रोगी कुठें तो आणून ठेवा. मी नाहींबा घरांत जायचा." असें तो छकडेवाला म्हणाला.

"गप्प बस लेका! फुकटचा सवा रुपया घेणार का? आधीं बोली करून आला आहेस. तुला समजत नव्हतं का तेव्हां? आतां तुझ्या गमजा नाहीं चालायच्या." असें पुनः त्रिंबकरावांनीं त्यास दरडावून सांगितलें. नाहीं होय करीत व "काय बामणांची तऱ्हा आहे? अरे वारे बामण!" असें म्हणत तो आंत गेला. आणि त्यानें त्या पोराचें मोटकुळें करून त्यास बाहेर आणलें: गंगाबाईनें तो सर्व प्रकार पाहून दुसरा कांहीं उपाय नाहीं म्हणून पटकन् त्याची गादी घेऊन आक्रोश करीतच ती बाहेर आली. परंतु नवऱ्यानें आक्रोश न करण्याबद्दल—एक हुंदका सुद्धां न काढण्याबद्दल पक्कें दरडावून तिला गप्प केलें. तिनें शेवटीं गादी त्या छकड्यांत टाकली. आणि छकडेवाल्यानें त्या पोरास आंत निजविलें. ती आपण बरोबर जातें म्हणून त्याच्या जवळ छकड्यांत बसूं लागली. परंतु नवऱ्यानें मोठा हिय्या करून जवळ जाऊन तिला ओढून खालीं उतरविलें. हातांत एक त्या पूर्वींच्या घराचा नंबर लिहिलेला कागद होता तो त्या छकडेवाल्याच्या अंगावर टाकला. 'कोणी तरी बरोबर आल्याखेरीज आपण छकडा हाणणार नाहीं' असें म्हटल्याबरोबर त्याला चार आणे जास्त देऊन लावून दिलें. हें अमानुष कृत्य करितांना त्रिंबकरावाच्या मनास दिक्कत वाटली नाहीं असें नाहीं. दिक्कत वाटलीच. परंतु वाईट कृत्य करणारा सुद्धां "आपण तें अगदीं नाइलाज म्हणून केलें, तेव्हां आपल्याकडे त्याबद्दल दोष नाहीं," असें आपल्यास खाणाऱ्या मनास वारंवार सांगून समाधान करीत असतो. पण असें समाधान त्यास मिळतें काय? त्रिंबकरावासारखेच लोक सांगूं जाणत. बायकोनें घरांत गेल्यावर फारच आक्रोश केल्यावर त्यानें तिला शंभरदां

असें सांगितलें कीं, मी दिवसांतून तीनदां तरी निदान जाऊन समाचार घेऊन येत जाईन. आणखी रोजीं रुपाया देऊन दोन माणसें त्याच्या तैनातीला ठेवीन. तूं गरोदर, तुझ्यासारख्यांनीं तिथें जाणें म्हणजे आपण होऊन हाल हाल करून घेऊन मरणाला पाचारण करण्यासारखें आहे, म्हणून मी तुला जाऊं दिलें नाहीं, दुसरें कांहीं नाहीं. आणखी माझी चाकरी सोडून जाणें मला शक्य नाहीं. त्यांतून माझें हापीस इस्पितळापासून फार अंतरावर नाहीं. तेव्हां त्याच्या समाचाराला जाण्याची आणखी त्याची काय खबर आहे, त्याला काय पाहिजे, काय नको याची चौकशी करायला मी मुळींच हयगय करणार नाहीं." असें आतांपर्यंतचा तो निष्ठुरपणा एका बाजूस ठेवून व आपला नेहमींचा गोडपणा धरून अगदीं त्या गोडपणाची परमावधि करून त्यांनीं आपल्या पत्नीची समजूत घालण्याची खटपट केली. ती कितपत यशस्वी झाली असेल हें वाचकांस सांगावयास नकोच.

ती बिचारी अगदीं स्वस्थ बसून झाल्या गोष्टीबद्दल खेद करीत होती. दुसरें काय करणार ? असल्या नवऱ्यापुढें तिचें चालणार तें काय ?

भाच्यास इस्पितळांत पाठवून दिला, त्याचा घरनंबर निराळाच दिला, तेव्हां आतां आपल्याला या घरांत राहण्याला कांहीं हरकत नाहीं. कोणी आपल्याला छळायला येणार नाहीं. न जाणों कदाचित् कोणी आलेंच, तर आपण आतां पुढच्या दारास कुलूप लावून मागल्या दारानें वहिवाट ठेवूं म्हणजे तपासणीच्या व्हालंटिअरांचाही सुळसुळाट नको. शिवाय त्या पहिल्या घराच्या मालकाच्या घरच्या केसीबद्दल आतां कांहीं होणार नाहींच. कारण आतां दोन दिवस झाले असें त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें खरें, परंतु त्या घरांत रहाण्याची छाती कुठें होत होती ? आतां पुनः इथून कोठें तरी पळून गेलें पाहिजे असें त्याच्या मनांत येऊन त्यानें पुनः दादासाहेबांकडे

धांव घेण्यापलीकडे दुसरा मार्ग नाहीं असें पाहिलें. परंतु आपला भाचा आपण इस्पितळांत पोहोंचविला हें सांगून ते आपल्यास कुठली जागा देणार? तेव्हां त्यांना ती बातमी न देतांच त्यांच्या घरांत घुसलें पाहिजे. असा विचार करून ते त्यांच्याकडे गेले व इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून व मधेंच मी आपल्या पाठीमागलें त्या भाच्याचें लचांड काढून टाकलें. त्याला त्याच्या आईकडे पोहोंचता केला असें सांगून, दोन दिवस झाले, पण त्या घरांत आपल्याला कांहीं चैन पडत नाहीं. आपण जेवणखाण दोन दिवस तेथें केलें तसें करूं, पण रात्रीं दोघेंही इथें निजायला येऊं असें सांगितलें. मनांतला विचार हा कीं, रात्रीं निजायला आल्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं आपल्याला जेवायला जायचें म्हणून सांगून आपण जेवण बाहेर काढूं आणि बायकोला तेथेंच ठेवूं. कांहीं तरी लटपट करूं. दादासाहेब फार सरळ मनुष्य. त्यानें त्यास जेवणाखाणासुद्धां घरांत येऊन राहण्याला ना म्हटलें नसतें. तें निजण्याला—आणि अशा दिवसांत तो नाहीं कसा म्हणेल? त्याचा हुकार पडतांच घरीं येऊन त्यानें आपल्या बायकोस धाकदपट करून असें सांगितलें कीं, कृष्णा इस्पितळांत पडला आहे असें जर तुझ्याकडून कळलें, तर पुनः मुखावलोन करणार नाहीं. आपल्या घरांत केस झाली असें त्यांना कळलें, तर ते आपल्याला घरांत कदाचित् जागा देणार नाहींत म्हणून मी त्यांना तें कळूं दिलें नाहीं. जर कळलें तर तें तुझ्याकडून कळेल एवढंच मला भय आहे. चार दिवस तिथें राहूं. आणखी लागलीच बाहेर मी झोंपडी बांधवतों, तींत जाऊं. तुला कृष्णाची अगदीं काळजी नको. मी चार वेळां सोडून सहा वेळां त्याच्या समाचाराला जाईन. तो बरा होऊन परत येईल. असें तसें पुष्कळ सांगितलें. आणि त्या रात्रीं तिला घेऊन तिकडे तो निजावयास गेला. आपल्या नवऱ्याच्या अंतःकरणाचा निष्ठुरपणा इतक्या विलक्षण प्रकारचा असेल

हें तिला स्वप्नींही आलें नव्हतें. परंतु आतां अनुभवास आलें. तरी काय होय? सध्यांच्या या भयंकर दिवसांमुळेंच तसें वर्तन करणें त्यांना भाग पडलें असेल असें तिनें आपल्या मनाचें समाधान केलें. दादासाहेबांच्या घरांत आल्यानंतर कृष्णाचा विचार मनांत येऊन रडण्याची सुद्धां तिला चोरी. पण किती केलें, तरी पतीच्या आज्ञेपुढें काय करणार? तिनें आंतल्या आंत गिळलें.

---

# प्रकरण ३ रें.

## अरे देवा! येथेंसुद्धां प्लेग!!

दादासाहेब हा गृहस्थ फार श्रीमान् होता. त्यानें मिळविलेली सर्व संपत्ति थोडीशी वडिलोपार्जित, परंतु बहुतेक स्वकष्टार्जित होती. एका मोठ्या संस्थानांत मोठी अधिकाराची जागा बरींच वर्षें त्याजकडे असल्यामुळें आणि कुटुंबाला फार माणसें नसल्याकारणानें त्यानें द्रव्यसंचय चांगला केला होता; आणि संस्थानांतील महारकी याच्यापुढें कर्तव्य नाहीं असें कांहीं एका प्रकरणावरून त्याच्या मनांत येऊन त्यानें एकदम आपली नौकरी सोडली व प्रथमपासून सावसावकारीकडे त्याची दृष्टि असल्यामुळें पुण्यांत आल्यावर तीच त्यांनीं आरंभिली. गहाणापाणाचा व्यापार करावा. गरीबगुरिबांना अगदीं थोड्या व्याजावर पैसे द्यावे असा क्रम आज जवळ जवळ सात आठ वर्षें त्यानें चालविला होता. आणि त्यांत परोपकारचा परोपकार होऊन त्याचें उत्पन्नही बरेंच झालें होतें. जेथें सर्व कांहीं अनुकूल असेल, तेथें कांहींना कांहीं तरी उणीव असते. त्याप्रमाणें येथें संपत्ति, कीर्ति वगैरेची चांगली विपुलता होती, परंतु संततीचा बहुतेक अभाव होता. बहुतेक म्हणण्याचा हेतु इतकाच कीं, दादासाहेबांस एकंदर पांचसहा

मुलें झालीं त्यांतून काय तो एक मुलगा उरलेला होता. त्यांच्या सर्व संपत्तीचा मालक काय तो तोच. तेव्हां अर्थातच त्याचें फार काळजीनें संवर्धन चाललें होतें. प्लेगानें दिवसानुदिवस गांवांत अंमल बसाविला तसतसे लोक गांव सोडून जाऊं लागले. दादासाहेबांच्या स्नेह्यांनींही त्यांस अनेक प्रकारांनीं सांगितलें, कीं आपण आतां उपेक्षा न करितां गांव सोडून जावें. परंतु लोकांच्या गहाणापाणाचा पसारा त्यांनीं मांडलेला होता, त्याची जबाबदारी केवळ एखाद्या कारकुनावर किंवा रखवालदारावर सोडून आपण जाऊं नये असें त्यांच्या मनांत वारंवार येऊन, आज जाऊं, उद्यां जाऊं असें करीत त्यांनीं दिवसगत चालविली. त्यांचें स्वतःचें घर फार विस्तीर्ण, नवें बांधलेलें आणि इतर घरांपासून अलग असें होतें. त्यांत वारा वगैरे उत्तम खेळे आणि स्वच्छतेविषयीं व डिसइन्फेक्ट करण्याविषयीं ते रोज स्वतः चांगली काळजी घेत यामुळें, आणि गांवांत बहुतेक पेठांत जरी प्लेग पसरत चालला, तरी त्यांच्या पेठेंत कांहीं अद्यापि सुरुवात झाली नव्हती यामुळें, त्यांना दिवसगतीवर आपलें जाणें टाकण्यांत कांहीं विशेष वाटलें नाहीं. तेथें जेव्हां जाण्याबद्दल असें टंगळमंगळ करताहेत असें दिसलें, तेव्हां अर्थातच त्यांची बायको त्यांना सोडून मुळींच जाईना. यांनीं आपल्याकडून तिला पुष्कळ सांगितलें, कीं तूं छोट्याला घेऊन आपल्या माहेरीं इंदुराकडे जा, परंतु आपल्याला सोडून कुठें जायची नाहीं असा तिनें निर्धाराचा जबाब दिला. अर्थात्च मुलगा एकटा ते कोठें पाठविणार ? त्यांनीं बाहेर जाण्याची इतकी तयारी केली होती कीं, बाहेर एक बंगला विसार देऊन गुंतवून सुद्धां दोनच दिवस झाले ठेवला होता. त्रिंबकरावाचा व त्यांचा गेल्या सात वर्षांतला स्नेह. त्यांत त्रिंबकरावांचे वडील व दादासाहेबांचे वडील हे वाटतें कोठें एकत्र होते अशी प्राचीन कथा निघाली. अर्थातच त्रिंबकरावांनीं दादासाहेबांशीं स्नेह आणि तो स्नेह दृढ करण्यास निदान

अगदीं गट्टीच्या स्थितीपर्यंत नेण्यास, तेवढें पुष्कळ होतें. दादासाहेबांचा स्वभाव फार भिडस्त, यामुळें तेही त्रिंबकरावाला कधीं फाजील सलगीबद्दल सुचवीत नसत. नेहमीं एके ठिकाणीं असण्याचा योग त्रिंबकराव नेहमीं आणीत. त्रिंबकराव संध्याकाळीं आफिसांतून यायचे ते दादासाहेबांकडेच यायचे. तेथेंच चहापाणी व्हायचें, सोंगट्यागंजिफा व्हायच्या, गाडींतून हिंडायला जायचें, असा क्रम असे. आठवड्यांत पांच चार जेवणें त्रिंबकरावांनीं दादासाहेबांकडे काढावयाचीं. त्रिंबकराव स्वतःही केवळ दरिद्री नव्हता. त्याला पगार शंभर रुपये होता आणि वडिलोपार्जितही थोडेंबहुत होतें. परंतु त्याचा स्वभाव फार कंजुष आणि लोभी असे. परंतु दादासाहेबांस कधीं त्यानें आपला लोभ दुसऱ्याच्या पैशाचा अभिलाष करीपर्यंत बळावला आहे असें मात्र दिसूं दिलें नाहीं. अर्थात्च त्यामुळें दादासाहेबांस कित्येक बाबतींत जरी त्याचा स्वभाव आवडला नाहीं, तरी एकंदरींत मनुष्य फार चांगला असा त्यांचा पक्का ग्रह झाला होता. आणि एकदां असा ग्रह झाला म्हणजे उगीच कोणी कांहीं सांगून तो बदलेल अशांतला गृहस्थ दादासाहेब नव्हता.

ज्याप्रमाणें दादासाहेबांचा त्रिंबकरावावर विश्वास, त्याचप्रमाणें वहिनीसाहेबांचा गंगाबाईवर फार विश्वास. त्या दोघींचा फारच चांगला स्नेह. आणि तो खरोखर दोन उत्तम स्वभावाच्या बायकांमधील स्नेह होय. वहिनीबाई गर्भश्रीमंत आणि गंगाबाई घरची जरी बरी, तरी नवरा फार चिक्कू असल्यामुळें अगदीं दरिद्र्याप्रमाणें रहाण्याची संवय झालेली; परंतु वहिनीबाईंनीं तिला अगदीं बरोबरीच्या नात्यानें वागवावी. इतकेंच नव्हे, तर वहिनीबाई गंगाबाईच्या स्वभावाचें वर्णन करून दादासाहेबांस सांगे, त्यामुळें दादासाहेबांच्या मनांतही तिच्याविषयीं फारच पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन तिच्यामुळें त्रिंबकरावांच्या कांहीं अवगुणांचें त स्वतःस विस्मरण पाडीत. अलीकडे गंगाबाई गरोदर असल्यामुळें

त्यांचा दोघींचा विनोद होई कीं, गंगाबाईला मुलगी होणार व ती पुढें आपण छोटूला करणार.

याप्रमाणें या दोन कुटुंबांचा स्नेह असल्यामुळें त्रिंबकराव आपल्या अडचणीच्या वेळीं दादासाहेबांकडे धांव घेईल आणि जी काय मदत पाहिजे असेल, ती हक्कानें करून घेईल यांत नवल काय ? तीं दोघें नुसतीं निजायला म्हणून तेथें आलीं हें ऐकतांच वहिनीबाईंस मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनीं दिवाणखान्यांत जाऊन त्रिंबकरावांची यथास्थित फजिती केली. ती फजिती त्रिंबकरावास अर्थातच बेचव लागली नाहीं. तिचा त्यांस तिरस्कार वाटला नाहीं. मात्र त्यांच्या मनांत आपल्या भाच्यासंबंधानें आपण जें वर्तन केलें, तें डांचत होतें, तथापि त्यांनीं आपल्या बायकोला शपथ घातली होती, कीं खरी स्थिति कळूं देतां उपयोगी नाहीं. आणि ती माउली बिचारी कृष्णाविषयीं हजार वेळां मनांत विचार येऊन जो गहिंवर दाटे, तो सर्व अगदीं आंतल्या आंत दाबून धरी. अगर अनिवारच झाला तर कोठें तरी एकीकडे जाऊन ती कंठ मोकळा करून शोक करी.

अशा स्थितींत सहा दिवस गेले. त्रिंबकराव रोज तिला कृष्णाचें बरें आहे म्हणून सांगे. मी गेलों होतों असें म्हणे. सहावे दिवशीं रात्रीं त्रिंबकरावानें आपल्या बायकोस एकांतीं भेटल्यावर कृष्णा निवर्तल्याचें वर्तमान सांगितलें. तो वारल्याचें वर्तमान त्यास आदलेच दिवशीं कळलें होतें, असें तो म्हणाला, परंतु हें वर्तमान आपण आपल्या पत्नीस सांगावें कीं सांगूं नये याबद्दल बरीच भवति न भवति होऊन सांगावें असें त्यानें ठरविलें आणि त्याबरोबर त्यानें “ जर रडशील कढशील, तर खबरदार ” असें बजावलें. परंतु आपण आग्रहानें ठेवून घेतलेला आपल्या नणंदेचा मुलगा केवळ नवऱ्याच्या निष्ठुरपणामुळें आणि आपल्या मिळमिळितपणामुळें इस्पितळांत जाऊन मेला. त्याला शेवटीं औषध पाजायच्यावेळीं सुद्धां कोणी नाहीं, कीं ‘ बाळा, ’ म्हणून अंगा-

वरून हात फिरवायला सुद्धां कोणी नाहीं हें मनांत येऊन तिचा दुःखावेग काय थांबतो ? तिनें त्रिंबकरावाच्या दटावणीला न जुमानतां एकदम जमिनीवर अंग टाकलें आणि ती ओक्साबोक्शीं रडूं लागली; परंतु त्यानें नानाप्रकारांनीं तिची समजावणी करण्याचा यत्न केला. तरी तिनें सरतेशेवटीं असा हट्ट धरला कीं, आपण आतां दुसरे दिवशीं यांच्या घरांत रहाणार नाहीं. त्रिंबकरावानें तिला हो हो करून व दुसरे दिवशीं त्या घरीं—जेथून कृष्णाला पाठविला त्या घरीं—जाण्याचें कबूल केलें. कारण कांहीं तरी करून तिचें समाधान करणें त्याला त्यावेळीं अगदीं जरूर होतें. नाहीं तर भलतेंच कांहीं होऊन बसावयाचें. शिवाय जी गोष्ट मुळींच करण्याचा त्याचा इरादा नसेल, ती करण्याबद्दल वचनें देण्यांत तो कधीं कमी करीत नसे. आपण आपल्या बिऱ्हाडीं एकट्या असलों, तर मनमुराद रडूं तरी, असें मनांत येऊन तिनें तो हट्ट धरला होता.

ती रात्र संपून प्रातःकाळ झाली. त्रिंबकरावाच्या आधींच गंगाबाई उठून तिनें जाऊन स्नान केलें. वहिनीबाई अजून उठल्या नव्हत्या. त्यांस रोजच्यापेक्षांही आज अधिक उशीर झाला. असें कां याचा विचार करण्याच्या स्थितींत गंगाबाईचें अंतःकरण नव्हतें, तथापि तिला थोडीशी अस्वस्थता वाटली. आणि ती चौकशी करणार तोंच वहिनीबाई अगदीं घाबऱ्या घाबऱ्या खालीं आल्या. त्यांना अतोनात दम लागलासें दिसलें. त्यांनीं गंगाबाईस पहातांच, आधीं भावजी कुठें आहेत त्यांना उठवून आणा म्हणून सांगितलें. " कां ? " असें गंगाबाईनीं विचारतांच वहिनीबाईंना एकदम रडें कोसळलें, आणि त्या एकदम म्हणाल्या, " बाई आतां आतां पाव घटका झाली असेल नसेल. एकाएकीं थडथडून थंडी वाजून ताप भरला आहे. आणखी या इथें काखेंत दुखतं म्हणून रात्रीं बारा वाजल्यापासून कुरकुर चाललीच होती. तेव्हां काय माझ्या नशिबीं आहे आणखी काय नाहीं ? ......"

तें वहिनीबाईचें बोलणें ऐकण्याबरोबर गंगाबाईचें काळीज चर्र झालें. तिनें आजपर्यंत कितीक लोकांना प्लेग झाल्याचें ऐकलें होतें, आणि प्रथम ती जेथें रहात असे, त्या घराच्या मालकाची सून तर तिनें प्रत्यक्ष पाहिलीच होती. काखेंत किंवा जांगाडांत दुखणें, नंतर कांहीं वेळानें हींव भरल्यासारखें होऊन ताप भरणें. तीं दोनही लक्षणें दादासाहेबांस झालीं आहेत असें ऐकतांच मग आणखी काय पाहिजे ? तिच्या मनाला क्षणमात्र असेंच वाटलें, कीं दादासाहेबांना प्लेगनें झपाटलें. परंतु ती चट्कन् आपल्या मैत्रिणीस म्हणते, " बाई, तुम्ही भलतन् सलतंच काय मनांत आणतां ? का आजपर्यंत लोकांना ताप आले नाहींत का काय नाहीं ? अगदीं सुद्धां तें मनांत आणूं नका.... पण माझं एक मागणं आहे, कीं दादासाहेबांना ताप आला आहे, ही गोष्ट तिकडे कांहीं कळूं देऊं नका. तिकडे कळली, कीं अगदीं ...आणखी. ... "

पुढें तिला कांहीं बोलायचें होतें, परंतु कांहीं तरी कारणानें तिनें आपली जीभ चावली. आणि ती लागलीच विषय बदलून म्हणाली, " बरं पण, आधीं आतां कांहीं डाक्तर वैद्य कोणी आणाल कीं नाहीं ? पाठवा कोणाला तरी. "

" डाक्टर वैद्य आणायचा खरा, पण मला सांगितलं आहे कीं, कोणाला आणूं नये म्हणून. हें मेलं सरकार आहे. डाक्तर आला कीं आधीं आतां तिकडे बातमी देऊन इस्पितळांत पाठवणार. त्यापेक्षां आपलं निभावेल तितकं मुकाट्यानं औषधं देऊनच निभवावं. अजून कांहीं त्यांतलं लक्षण दिसत नाहीं. खांकेंत दुखतं म्हटलं, पण कांहीं गोळा का काय म्हणतात त्यांतलं कांहीं सुद्धां नाहीं. अगदीं कांहीं नाहीं. मीं चांगलं चेपून चापसून पाहिलं. उगीच एका चिंचोक्या-इतक्या जागेंत बारीक गरसेसारखं आलं आहे. किती पण ! वाटाण्याएवढी असेल नसेल. तो गोळा म्हणतात असा एवढा होतो. तसं तर कांहीं नाहीं. "

गंगाबाईचें व वहिनीबाईचें मत जुळलें, कीं तें कांहीं हें दुखणें नव्हे. हा जरी वरून खूप निश्चय झाला, तरी पण मनांत दुसरी शंका आपला ताबा थोडाबहुत दाखवीतच होती. गंगाबाईला एक वैद्याचा काढा ठाऊक होता तो तिनें सुचविला आणि त्यांतलीं औषधें आणण्यासाठीं वहिनींबाईनीं आपल्या अगदीं विश्वासांतला असा माणूस पाठविला. सगळी चोरी. अमक्या घरांत अमक्या माणसानें तापाच्या काढ्याचीं औषधें आणलीं एवढें कोणाला कळलें पुरे, कीं लागलीच कोणीना कोणी तरी हातांत काळी वही घेऊन 'कोण आजारी आहेहो?' म्हणून चौकशी करायला आणि घर शोधायला आलाच. गंगाबाई व वहिनीबाई यांचें हें चाललें होतें खरें, परंतु दोघींच्याही डोळ्यांतून एकसारखे अश्रू वहात होते. व वहिनी-बाईच्या तर तोंडचें पाणी पळालें होतें हें उघडच आहे, आणि गंगा-बाईचा स्वभाव अतिशय प्रेमळ आणि बहिनीबाईवर अतोनात भक्ति यामुळें तिच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रू वहात होते. इतक्यांत त्रिंबक-रावमामा खालीं उठून आले. त्यांस पाहतांक्षणींच वहिनीबाई एकदम, "अहो, वर जा. वर जा. आधीं, काय झालं आहे तें बघा" असें अगदीं गहिंवरून म्हणाल्या. याही वेळीं गंगाबाईच्या मनांत असें आलें कीं, त्यांना सांगूं नका म्हणावें, परंतु तिच्या तोंडून तसें कांहीं निघण्याच्या आधींच वहिनीबाईच्या तोंडून वरील उद्गार निघून गेले. आपल्या नवऱ्यास हें कळलें तें बरें झालें नाहीं असें गंगाबांईस पक्कें वाटलें.

त्रिंवकरावमामांस जळीं स्थळीं, काष्ठीं पाषाणीं, घरीं दारीं जिकडे तिकडे प्लेग दिसत होता. दुसरें कांहीं नाहीं. कोणी जलद चाललें, जलद बोललें, कीं त्याच्या मनांत प्लेग आलाच. कोणी त्याला हांक मारली कीं, प्लेगखेरीज दुसरें कांहीं कोणी बोलणार नाहीं ही त्याची बुद्धि. वहिनीबाईनीं वर जाऊन पहा हो असे गहिंवरत उद्गार काढल्याबरोबर

त्याचें धाबेंच दणाणलें. पहिल्या घरीं प्लेग, दुसऱ्या घरीं आलों तेथें प्लेग. त्यांतून निसटून या चांगल्या घरीं आलों तरी प्लेग! अशी स्थिति झाली, तेव्हां बिचारा काय करील? वहिनीबाईंनीं पुनः त्याला चला वर असें म्हटलें, तेव्हां तर तो अगदींच घाबरला. प्लेग म्हटला कीं, थाऱ्यास उभें राहणें म्हणजे कोण मुष्किलीचें काम आणि ही बाई 'चला चला' म्हणून पाठीस लागली. तेव्हां आतां काय करावें? असें होऊन त्याची तिरपीट उडाली. तरी अजून पक्केपणीं काय आणि कशाला आपल्याला वर बोलावतात हें त्याला समजलेंच नव्हतें. पण अंगावर येऊन बेतलेंच म्हणजे मनुष्य कांहीं तरी धैर्य धरून त्यांतून निसटायला पहातो, धडपड करतोच. त्याप्रमाणें त्रिंबकरावमामांची स्थिति झाली. त्यांनीं तितक्यांतल्या तितक्यांत धैर्य धरलें आणि वहिनीबाईंस म्हटलें, "अहो, पण काय आहे काय? अशा घाबरूं नका. अहो काय? झालं काय? तें सांगाल कीं नाहीं नीट."

"काय सांगूं आतां तुम्हांला? पण तुम्ही वर या. मग सांगतें. इथें मोठ्यानं सांगण्याजोगं नाहीं," असें म्हणून वहिनीबाई वर चालल्या. बिचाऱ्याचा अर्थातच नाइलाज झाला. एक वेळां त्याच्या मनांत आलें, कीं हो हो करून पागोटें चढवून यःपलाय करावें, तें पुनः परत येऊंच नये. पण इतके दिवस वाटेल तसें येऊन अगदीं स्नेहभाव राखून धुडगुस घातला, आणखी आतां अशा वेळीं अशा रीतीनें तोंड चुकवून पळून जाणें बरें नव्हे. त्याला संशय आला, कीं छोटूला प्लेग झाला असावा. परंतु इतक्यांत छोटू धांवत धांवत वरून खालीं आला व आईला म्हणतो, "आई, दादासाहेब असं कांग करतात? पांघरूण घेऊन अजून कां निजले आहेत? मी जवळ जायला लागलों, तर 'हं हं! येऊं नको, येऊं नको' असं कां सांगतात?"

असें त्यानें विचारतांच त्या माउलीला आपला गहिंवर आवरेना व ती एकदम "बाळा! कायरे सांगूं तुला? आपलं नशीब फु.........

.........” पुढचीं अक्षरें कंठांतल्या कंठांतच जिरलीं. तें ऐकण्याबरोबर मात्र त्रिंबकरावमामा अगदींच खरकले. आतां आपल्याला वर गेल्याखेरीज गत्यंतर नाहीं हें उघडच आहे, हें त्यांनीं जाणलें आणि जणूं काय पायांत कमींत कमी दीड दीड मणाच्या बिड्या असल्याप्रमाणें जड पावलें टाकीत तो वर चालला. दादासाहेब ज्या खोलींत होते त्या खोलीजवळ गेला. पुनः त्याला अशी इच्छा झाली कीं, तेथूनच कांहीं तरी निमित्त काढून सूंबाल्या करावा, परंतु तितक्यांत वहिनीबाईनीं त्या खोलीच्या दारांतून ‘या, इथेंच निजले आहेत’ म्हणून सांगितलें. मग काय उपाय? लागलीच पुढें जावें लागलें. तो आंत गेला आणि दादासाहेब ज्या पलंगावर निजले होते त्यापासून जेमतेम दोन हातांच्या अंतरापर्यंत जवळ गेला. पुढें कांहीं केल्या जाववेनाच. अगदीं भडकलेले घोडे लावूनसुद्धां बिचारा पुढें ओढला गेला असता कीं नाहीं कोण जाणें!

त्याला पाहतांच दादासाहेब एकदम त्यास म्हणाले, “त्रिंबकरावमामा, आतां आमची तर कांहीं धडगत दिसत नाहीं. आम्ही आपल्या वाड्यांत अगदीं सुरक्षित सुरक्षित असं समजत होतों, पण शेवटीं आम्हाला पछाडलंच यांत कांहीं शंका नाहीं. (हुंदका न आवरून रडूं लागणाऱ्या बायकोकडे पाहून) अशी तूं धीर सोडूं नको. जें व्हायचं असेल तें कधीं कुठेंही गेलों असतों तरी टळलं नसतं. दुसऱ्या किती लोकांवर कसे प्रसंग आले आहेत त्याचा विचार कर. त्रिंबकराव, माझी इच्छा आतां एवढीच आहे कीं, आजपर्यंतच्या तुमच्या माझ्या स्नेहाचा मला उपयोग व्हावा. एक पहिली गोष्ट ही कीं, माझं माझं जें काय होईल तें घरांतल्या घरांत व्हावं. त्यापायीं किती रुपये खर्च झाले तरी हरकत नाहीं. आणखी दुसरं हें कीं, आतां तुम्ही यांत मन घालून परवानगीनं साखसुरत झालं तर साखसुरत; नाहीं तर लपवून झालं लपवून, पण घरांतल्या घरांत काय होईल तें बघा. आपल्या

डाक्तरांना निरोप पाठवा. आणखी त्या छोटूला आणखी हिला आतांच्या आतां कुठें तरी बाहेर लावून द्या."

"कोणाला? मला?" वहिनीबाई तितक्यांत आपला हुंदका आवरून व डोळे पुशीत पुशीत आवेशानें म्हणाल्या, "मला बाहेर पाठविणार आपण अशा स्थितींत असतांना? प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी सुद्धां मी हलायची नाहीं, छोटूला पाठवा कुठें तो. पण तो सुद्धां आपल्यापासून फार दूर नको. गांवाबाहेर बंगल्यांत जाऊन राहूं द्या."

इतक्यांत दादासाहेबांना थोडीशी झांपड आल्याप्रमाणें झालें आणि एक विचूक शब्द गेला कीं काय असें त्यांचें त्यांनाच वाटलें. छोटूला बंगल्यांत घेऊन रहाण्याचें नांव निघतांच त्रिंबकरावमामांच्या शरीरानें जरी नाहीं, तरी मनानें आनंदाची उडी मारली. आणि ते एकदम म्हणाले, "मी तर हें तुम्हांला किती दिवस सुचवून सुचवून दमलों. असो, आतां त्याचं काय? आतां मी आपला त्याला घेऊन बंगल्यांत जाऊन रहातों. आमच्या कुटुंबाचा त्याला ळळा आहेच; तेव्हां तिच्याजवळ तो चांगला राहील. शिवाय मी पाहिजे तर दहा पंधरा दिवसांची रजा घेतों आणखी त्याला संभाळायला राहतों. अगदीं त्याला गांवांत येऊं देत नाहीं. वहिनीसाहेब म्हणतात तेंही अगदीं खरंच. आपली प्रकृति अशी बिघडलेली, आणखी त्यांना इथून जाणं शक्य तरी कसं? मला सुद्धां तें मोठं विलक्षण वाटतं आहे. पण छोटूला बाहेर नेऊन तर ठेविला पाहिजे. आणखी त्याला बाहेर न्यायचा, म्हणजे अर्थातच कोणी तरी त्याच्याजवळ काळजीचं माणूस पाहिजे. बाकी माझी इच्छा अशी आहे कीं, मी आतां आपल्याजवळ एकसारखें बसून रहावं—पण आपला ताप कांहीं मला त्यांतला दिसत नाहीं. मी—आमच्या ऑफिसाच्या शेजारींच इस्पितळ आहे कीं नाहीं? तर मी तेथें नेहमीं जातों. तेव्हां अनेक रोगी

पाहिले आहेत. त्यांतलें एक सुद्धां लक्षण आपल्या चर्येवर दिसत नाहीं. आपला आधीं असा समज झाला तरी कसा कीं आपल्याला हा ताप आला आहे ?" शेवटलीं एक दोन वाक्यें कानीं पडतांच वहिनीबाईंची चर्या एकदम किंचिन्मात्र उत्सुक झाली. त्यांतला ताप नाहीं असें, आणि ज्यांनीं इस्पितळांत जाऊन अनेक रोगी पाहिले आहेत अशा त्रिंबकरावमामांनीं म्हटलें, तेव्हां खरेंच तसें कांहीं तरी असलें पाहिजे असें त्यांस वाटलें, आणि एकदम त्या "तुमच्या तोंडांत साखर पडो. मला सुद्धां वाटलं तो ताप नाहीं म्हणून. इकडचा स्वभाव मोठा घाबरा आहे दुखण्याच्या कामांत. त्या तापाचीं तीं लक्षणंच निराळीं मीं ऐकलीं आहेत. आधीं मेला म्हणतात एवढा गोळा येतो. तसा आहे कुठें ? उगीच मिऱ्याएवढी सुद्धां गरस असेल का नाहीं कोणास ठाऊक ? तों एकदम सगळ्यांना घाबरून सोडायचं," असें उद्गारल्या.

त्रिंबकरावमामांची, जरी आतांपर्यंत दादासाहेबांचा हा ताप तोच असावा अशी खात्री झाली होती, तरी पण गोळा आहे कीं नाहीं याबद्दल कांहींच बातमी त्यांना लागली नव्हती, आणि बारीक गरस आहे असे शब्द कानीं पडतांच एकदम स्वारी तोफेच्या गोळ्यानें धडपडावी त्याप्रमाणें धडपडली. काय युक्ति करून बाहेर पडूं असें त्यांना झालें. आणि लागलीच ते, "बरं. तर मी आतां घरांतच राहूं देण्याच्या परवानगीबद्दल कांहीं तरी खटपट करून येतों. हो, तो जरी ताप नसला, तरी ताप म्हटला कीं या लेकांना आपलं इस्पितळांत पाठवायचं ठाऊक. दुसरं काय ? अगदीं लेकाचे पाजी. त्यांना श्रीमंत ठाऊक नाहीं, दरिद्री ठाऊक नाहीं, थोर ठाऊक नाहीं, हलका ठाऊक नाहीं, नेटिव म्हटला, कीं सरसहा एक माप. आतां व्हालंटिअर आला तर तुम्ही कसा तरी वाटेला लावून द्या म्हणजे झालं. इकडे मी थोरल्या हापिसांत तालामाला पाहून जुळण्याजोगं असलं,

तरच मुळीं बातमी देईन आणखी आपल्या डाक्टराला आणीन, नाहीं तर आपलं मुकाट्या मुकाट्या घरांतल्या घरांतच औषध देऊं. लेकाचे डाक्टर तरी काय करतात! त्यांच्या उरावर यांचा कायदा आहेच, कीं जितके म्हणून रोगी त्यांच्याकडे येतील—मग ते पायाचे असोत, नाकाचे असोत, कीं आणखी कसले असोत, सगळ्यांच्या दुखण्याचा पत्त्याबित्त्या सुद्धां अगदीं रिपोर्ट आला पाहिजे. काय करतील बिचारे! म्हणून म्हणतों आपले नेहमींचे डाक्टर उपयोगी नाहींत आधीं. नाहीं तर त्यांच्याचमार्फत मुळीं सगळा काय तो कारभार करवूं म्हणजे त्यांचं त्यांचं बरं तें जमतं." असें म्हणून स्वारी बाहेर पडली. त्या खोलींतून बाहेर आल्यावर अर्धा, आणि त्या माडींतून बाहेर गेल्यावर बहुतेक असा त्रिंबकरावांचा जीव पार पडला. लागलीच त्यांनीं एक घोड्याची गाडी जोडण्याचा हुकूम केला. एक ब्राह्मण व दोन शिपाई सैंपाकाचें सामानसुमान घेऊन बंगल्यांत ताबडतोब जावें म्हणून हुकूम फर्मावला. गाडी येतांच आपल्या कुटुंबास बोलावून आणून छोटूला घेऊन त्या गाडींत बसण्यास सांगितलें. छोटू रडत होता, तरी तसेंच त्याला आंत बसविलें. बायकोच्या अंगावर खेंकसून तिलाही बसविलें आणि बरोबर एक शिपाई देऊन गाडी लावल्यानंतर मग खालूनच त्यांनीं वहिनीबाईस खालीं बोलावून आपण काय काय केलें तें सांगितलें. सांगितलें तें इतक्या कळकळीच्या गोड शब्दांनीं कीं, आपल्याला छोटूला विचारूं सुद्धां दिलें नाहीं याबद्दल जें कांहीं वहिनीबाईच्या मनांत यायचें तें सुद्धां आलें नाहीं. एकुलतें एक पोर आतां या घरांतून जितक्या लवकर जाईल तितकें सुरक्षित राहील, म्हणून इतकी गर्दी केली असें त्यानें तिला पक्कें भासवून दिलें. आणि आपण आतां इकडे आफिसांतल्या कारभाराला जातों म्हणून स्वारी गेलीसुद्धां.

यावेळीं त्रिंबकरावमामा नसते, तर आपली काय त्रेधा उडाली असती असें क्षणभर तिच्या मनांत येऊन ती पुनः वर आपल्या

नवऱ्याकडे गेली. छोटूची रवानगी बंगल्याकडे केली आणि गंगाबाई बरोबर आहे असें ऐकतांच दादासाहेबांसही समाधान झालें. स्नेही जवळ असले, तर असे आपल्याला उपयोगीं पडतात असें उलट त्यांच्या मनांत आलें.

---

# प्रकरण ४ थें.

## पुनः केस !

त्रिंबकरावमामा रस्त्यानें चालले ते आपल्या मनाशींच विचार करतात कीं, ही वेळ तर दादासाहेबांच्या जवळ न जातां शिताफीनें पार पाडली आणि बंगल्यांत जाऊन रहाण्यालाही उत्कृष्ट सवड काढली. परंतु आतांची कामगिरी कशी पार पडणार? दादासाहेबांचें म्हणणें कीं, एक तर घरांतल्या घरांत रहाण्याची परवानगी तरी मिळवावी, किंवा मुकाट्यानें घरांतल्या घरांत काय तो कारभार होऊन औषधपाणी तरी मिळावें. घरांतल्या घरांत राहण्याची परवानगी मिळाली, तर आपल्याला त्यांच्याजवळ केव्हांना केव्हां तरी बसणें, दिवसांतून एक वेळां तरी येऊन जाणें, भाग पडणार. कारण माणुसकीला शोभेसें केलें पाहिजे. इस्पितळांत गेलें म्हणजे ती पंचाईत पडणार नाहीं. कारण इस्पितळांत फार तर दोन अटेंडंट राहूं शकतात. ज्यास्ती नाहींत. मग आपण रोज एकदां दोनदां बाहेरून चौकशी करून गेलें म्हणजे झालें. ही विचारसरणी चालतां चालतां त्रिंबकरावमामांच्या मनांत नानाप्रकारचे आणखी विचार येऊं लागले. आणि ते जसजसे आले तसतशी त्यांची चित्तवृत्ति थोडी विलक्षण होऊं लागली. परंतु त्या सर्व कृष्ण विचासरणीच्या नागमोडी वळणांनीं आपणही धडपड करीत जाण्यापेक्षां त्यांची पुढली एकंदर कृत्यसरणी मात्र पाहूं म्हणजे झालें. जातां जातां त्यांस पेठेचे चीफ

व्हालंटिअर भेटले. त्याबरोबर आधीं त्यांनीं त्यांस नमस्कार करून पेठेची हालहवाल विचारली व नंतर "काय हो, एखाद्या रोग्याला घरांतच ठेवण्याची परवानगी मिळवायची असली, तर त्याच्या करतां काय काय खटपट करावी लागते ?"

रोग्याविषयीं—अर्थातच प्लेग रोग्याविषयीं—प्रश्न ऐकतांच व्हालंटियर-साहेबांनीं चटकन् आपले कान उभारले आणि " कां कां ? ही कां चौकशी करतां ? कोणी आहे का कुठें ? काय करावं बोआ इतका त्रास आम्ही करून घेतों, पण रोग म्हणून कांहीं हटत नाहीं. कुठें आहे कोण आजारी ? "

"आजारी नाहीं हो. आपले आम्ही अजून गांवांतच आहोंत, तेव्हां आपली चौकशी करून ठेवावी एवढ्याच हेतूनं विचारतों. आजारीबिजारी कोणी नाहीं. तुम्हांला दुसरं कांहीं दिसतच नाहींना ? "

" तुमच्या शब्दांनीं जरी तुम्ही नाहीं म्हणतां आहां, तरी चेहरा निराळंच कांहीं सांगतो आहे बरं का. मला सांगा कोण आजारी आहे तें. अगदीं सुद्धां शंका मनांत नका आणूं. मी तुम्हांला वाटेल ती मदत करीन. आमचं पहाणं एवढंच, कीं आमच्याकडून रिपोर्ट झालेला असला पाहिजे. मग रोगी घरांत ठेवोत कीं आणखी कुठें नेऊन घालोत ! "

त्रिंबकरावमामा ( डोळे मिचकावून ) " तुम्ही तरी मोठे बोआ पाताळयंत्रीच दिसतां. अगदीं सुतानं स्वर्ग काढणारे तुम्ही ! तेव्हां आम्हीं नाहीं सांगितलं, तरी पण तुम्हाला बातमी लागणार नाहीं असं थोडंच ! पण ही केस् अशी आहे कीं आम्हीं सांगणं कांहीं चांगलं नाहीं. "

" तें कांहीं नाहीं. तुम्हीं सांगितलं पाहिजे, " व्हॉलंटिअरसाहेब जोरानें म्हणाले. " मी तुम्हाला सांगितलंच पहिल्यानं कीं तुम्हाला

जी काय मदत पाहिजे असेल ती आम्ही पाठीमागून अगदीं मनोभावानें करूं, त्यांत बिलकुल कसूर करणार नाहीं. कोण हो ? कोण आजारी आहे ? प्लेगच का ? बहुतकरून प्लेगच दिसतो आहे. नाहीं तर इतकी त्याच्याबद्दल भानगड तुम्ही कशाला करतां आहां ?"

"आतां तुम्ही सोडीतच नाहीं, तर माझा नाइलाज आहे—" त्रिंबकरावमामा जणूं काय अतोनात अनिच्छा असल्याप्रमाणें चर्या व हातवारे करून आणि तसाच आवाज बदलून म्हणतात, "पण इकडे पहा, माझं नांव कळतां कामा नये अं ? गृहस्थ पडला फार मोठा, आणखी आमच्या स्नेह्यांपैकीं, तेव्हां आम्हीं येऊन बातमी दिली म्हणून जर कां कळलं, तर विनाकारण...पण जाऊं द्याना ? तुम्हाला तरी काय करायचं आहे ? आज सकाळींच ताप आला आहे आणखी अंमळ इथें दुखतं आहे." व्हॉलंटिअरसाहेबांची जिज्ञासा अर्थातच अधिक जागृत झाली आणि त्यांनीं अधिक खोदखोदून विचारलें. तेव्हां अर्थातच त्रिंबकरावमामांनीं त्यांस सांगितलें आणि पुनः पुनः बजावून सांगितलें कीं, आपलें नांव बाहेर फुटतां कामा नये. व्हॉलंटिअरसाहेबांनींही त्यांस "ठीक आहे. ठीक आहे. ह्याबद्दल मुळींच तुम्हाला शंका नको. अगदीं तुमचं नांव फुटायचं नाहीं. बहुतेक केसेसचा आम्हाला पत्ता लागतो तो आपल्यासारख्या परोपकारी गृहस्थांच्यामुळेंच लागतो, तेव्हां आपलीं नांव आम्ही कशीं बाहेर फोडूं ?" असें विलक्षण चर्या करून व विशेष रीतीनें पाहून त्रिंबकरावमामांस म्हटलें. त्या पाहुण्यानें त्रिंबकरावांस अंमळ लाजल्याप्रमाणें होऊन विषय बदलण्याच्या हेतूनेंच काय ते त्यांस म्हणतात, "बरं पण आतां पुढें तुम्ही काय करणार ?"

"काय करणार ? आम्ही डाक्तराच्या हापिसांत रिपोर्ट पाठविणार. आम्हाला कळल्यावर आम्हाला रिपोर्ट केल्यावांचून दुसरें काय करतां येणार आहे ? बाकी दादासाहेबांसाठीं चीफ् प्लेग अर्थॉरिटीकडे शिफा-

रस केली, तर ते घरांत ठेवतील; नाहीं तर निदान इस्पितळांत स्पेशल तजवीज करतील. तंबू–बिंबू मारून निराळी आपली व्यवस्था करतों म्हणाल तर तेंही करूं देतील. मी शिफारस करायला येईन पाहिजे तर. पण मला आतां गेलें पाहिजे. आफिसांत काम किती तरी आहे. आणखी पेठेंत आज जरा रोग वाढत्या प्रमाणावर आहे."

यापुढें व्हालंटिअरसाहेब एक क्षणभरही तेथें राहिले नाहींत. आपण किती खुबीनें बातमी काढली याबद्दल त्यांच्या मनाला समाधान झालें, आणि आपला अर्धा कार्यभाग तर सोळा आणे उरकला असें वाटून त्रिंबकरावमामांसही समाधान झालें. त्रिंबकराव मामा तेथून निघून आपण आतां परस्पर बंगल्यावरच जावें कीं एकवार दादासाहेबांच्याकडे जावें याच्या विचारांत कांहीं वेळ गढले. नंतर त्यांना आपल्या आफिसांत रजेबद्दल चिठी पाठवावयाची होती ती लिहून तयार करण्यासाठीं ते गेले आणि शेवटीं त्यांनीं दादासाहेबांकडे घरीं जाण्याचा निश्चय केला. तेथें त्यांचा समाचार घेऊन स्वारी बंगल्यावर जाणार होती. त्रिंबकरावमामा दादासाहेबांच्या घरच्या रस्त्याला जों वळतात तों दारांत एकच गर्दी. एक टांगा व एक गाडी दाराशीं उभीं असून हातांत रुमाल व जस्ती झारी घेतलेला एक पोरगा आणि नोटवही व पेन्सिल घेतलेला दुसरा इसम घराचा नंबर पाहून दारावरील शिपायाशीं हुजत घालीत आहेत. तो इसम म्हणतो, "आहे इथें आजारी आहे" आणि शिपाई म्हणतो, "इथें आजारी कोणी नाहीं." त्रिंबकरावमामा वळणापाशींच थबकले. साहेब डाक्तर खालीं उतरून आंत जातांना त्यांनीं पाहिला तेव्हां आतां काय होतें तें होऊं द्यावें, आपण आपलें लांब रहावें आणि मग जावें तें चांगलें, असा पोक्त विचार त्यांनीं केला. सुमारें पंधरा मिनिटांत डाक्तर येऊन गाडींत बसून आपल्या लव्याजम्यानिशीं धडधड करीत दुसऱ्या कोणाच्या घराकडे पुढें निघून गेला. नंतर दहामिनिटांनीं

त्रिंबकरावमामांनीं आपलें पाऊल पुढें घातलें. दारांत जातांच तो शिपाई वगैरे आपापसांत कुजबुजताहेत. अमुक झालें नसतें तर आपण त्यांना खास आंत पाऊल घालूं दिलें नसतें, अमुक झालें असतें तर पाहिलें असतें काय होतें तें, अशा मागल्या गप्पा मारीत होते. इतक्यांत त्रिंबकरावमामा दारांत आले. त्यांच्याकडे पाहून सर्वांनीं एकदम, "मामासाहेब, मामासाहेब; आपण मघाशीं इथें नव्हतां. केवढा थोरला तरी सगळा गोंधळ उडून गेला. अहो काय हा प्रसंग ओढवला! आतां आपण तरी बाईंच कांहीं करूनशी घरां-तल्या घरांत ठिवलं तर बगा, नाहीं तर आमच्यासारकीं मानसं जित जातात तितच तुम्ही दादासाबास्नी बी न्येनार व्हय!" इत्यादि इत्यादि अनेक प्रकारचे प्रश्न केले. त्रिंबकरावमामा अगदीं वेड्यासारखें सोंग घेऊन भांबावल्यासारखें करून काय झालें, काय नाहीं, असेंच विचारीत सुटला. शेवटीं ओटीवर जातात तों वहिनीबाईंनीं, "अहो, हेंच का तुम्ही करायला गेलांत तें! घरांतल्या घरांत ठेवायचं जुळवणार होतां तें असंच का? छे. छे. बाई! त्या डाक्तरला पाह्यलं आणखी माझे तर पाय लटलटा कापायला लागून मी अगदीं आतां दारांतच पडतें, आतां आपल्याला उभं सुद्धां रहावत नाहीं असं वाटूं लागलं. भराभरा बूट आपटीत येऊन हिंदुस्थानींत मेल्यानं विचारलंन् आजारी कुठें आहे, आणखी शिपायानं खोली दाखवल्याबरोबर एकदम आंत शिरून नाडी पाह्यलीन्, जीभ पाहिलन् आणखी खांकेंत चापसून कोणच्या इस्पितळांत जायचं म्हणून प्रश्न विचारलान्. कोणीसं कांहीं सांगितलं मग त्या बरोबरीच्या ब्राह्मणाला, कीं घरांतच राहूं देण्याच्या-बद्दल परवानगी मिळवायला. तेव्हां "नाहीं, नाहीं." असें मोठ्यानें म्हणून कागदाच्या तुकड्यावर कांहीं पेन्सिलीनें खरडून तो कागद कोणाच्या जवळ टाकून आले तसे गेले. तुमच्या पाठीमागें हें इतकं भारूड झालं. आतां काय करायचं सांगा. त्यानं सांगितलं आहे कायसं कीं तें दोन

तासांच्या आंत झालं पाहिजे. दुपारला घर धुवायला सोजीर येईल. अरे नशीबा, कसारे माझ्याच पाठीमागें लागलास हात धुवून ! असं मी तुझं काय केलं !" असें म्हणून तिनें शोकास आरंभ केला आणि घरांतील स्वयंपाकाची बाई व शिपाई मंडळी तटस्थपणें उभीं राहिलीं होतीं.

इकडे वहिनीबाईच्या शोकाबरोबरच त्रिंबकरावमामांच्या शिव्यांस सुरुवात झाली. "कोणा लेकानं जाऊन चुगली केली ! हे आमचे, आमचेच लोक बडे हरामखोर आहेत. लेकांना घरचं खाऊन लष्करच्या भाकरी भाजल्याखेरीज होत नाहीं. कोणी तरी घरांतून बाहेर जाऊन बातमी दिल्याखेरीज कांहीं हें झालेलं नाहीं. अगदीं खचित नाहीं. दादासाहेबांचं अन्न खाऊन असलं कपट करणारा माणूस म्हणजे अगदीं काय आतां बोलायचं आहे ! कांहीं कांहीं अगदीं शिकस्त आहे बोआ लोकांची. निनांवी पत्रें काय लिहितात ? चुगल्या काय करतात ? आज ही बातमी कोणी तरी मुद्दाम जाऊन सांगितल्याखेरीज कांहीं बातमी बाहेर गेली नाहीं, अगदीं खचित. अति नीच, अतोनात नीच आमचे लोक. आणखी हे व्हालंटिअर तर बोलून चालून साहेबांचे हस्तकच बनलेले. मी म्हणतों कोणी हरामजाद्यानं जाऊन सांगितलं असलं म्हणून यांनीं लागलीच रिपोर्ट करून डाक्तरला पाठवून एवढं करायचं कारण काय ! तो लेकाचा साहेबय् भेटला नाहीं मी खटपट करायला गेलों तर. आतां काय करणार ? आतां मला वाटतं आपलं मुकाट्यानं इस्पितळांत गेलं पाहिजे. दुसरं काय ? हो, साहेब कांहीं आतां या उपरांत भेटायचा नाहीं. तो गेला आपल्या कळपांत. आणखी आजच्या आज दोन वाजायच्या आंत तर रोगी हलवण्याविषयीं यांची तसदी. छेः छेः छे. आमची श्रीमंतांची जर ही त्रेधा तर गरीबगुरीबांचे काय हाल होत असतील !"

त्रिंबकरावमामांची ही चर्पटपंजरी चालली असतांच दादासाहेबांचे दुसरे एक ओळखीचे गृहस्थ कृष्णराव म्हणून तेथें आले. त्यांस

दादासाहेबांच्या आजारीपणाची बातमी नुकतीच मुख्य आफिसांत लागली. दादासाहेब म्हणजे कांहीं अगदीं उगीच कुठला तरी माणूस नव्हे. तेव्हां त्यांच्या आजारीपणाची बातमी फुटतांच ती एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या अशी होत गेलीच. कृष्णराव तेथें जाण्याबरोबर त्यानें आधीं बातमी खरी कीं काय याबद्दल चौकशी करून खरी असें कळतांच ते कोठें निजले आहेत त्याचा शोध केला आणि लागलीच माडीवर जाऊन आपण स्वतः त्यांची प्रकृति पाहिली. दादासाहेबांस आतां ताप अधिकच चढला होता. परंतु अद्यापि त्यांची शुद्ध कायम होती. आपल्यास केव्हांपासून हें झालें वगैरे त्यांनीं सांगितलें. आणि औषध काय घेतलें तेंही पण सांगितलें. शिवाय डाक्तर आतांच येऊन पास देऊन गेला, परंतु आपल्याला घरांतच औषध-पाणी करण्याची तजवीज झाली तर करावी अशी त्यांनीं आपली इच्छा पुनः दर्शविली. कृष्णरावांनीं मी खटपट करतों म्हणून सांगितलें. तितक्यांत त्रिंबकरावांनीं आपण खटपट करण्यासाठीं गेलों होतों परंतु साहेबाची भेटच झाली नाहीं असें ठेवून दिलें. कृष्णरावांनीं “ कांहीं हरकत नाहीं. मी त्यांना क्लबांत जाऊन भेटून पहातों ” असें उत्तर दिलें. दादासाहेबांस धैर्य येईल असेंही भाषण केलें, आणि ताबडतोब डाक्तरांना आणण्याला कोणी तरी पाठविलें पाहिजे म्हणून सांगितलें. व मग ते तेथून निघून गेले आणि त्रिंबक-रावमामाही, “ बरें तर, आपण हें पतकरलें फार चांगलें झालें. आतां माझी ती एक काळजी निवारण झाली. मी आतां तिकडे छोटेरावांची काय व्यवस्था आहे ती पाहून अर्ध्या तासाच्या आंत येतों ” असें त्यांस व वहिनीसाहेबांस सांगून स्वारी निघून गेली. बिचाऱ्या वहिनी-बाईनीं अजून अंगावर पाणी सुद्धां घेतलें नव्हतें, मग कांहीं तोंडांत घालण्याची कोठली गोष्ट! पण त्यांनीं अंगावर पाणी घेऊन थोडें दूध तरी घ्यावें असें करण्याससुद्धां त्या घरांतल्या बाईस किती आयास

पडला. पुष्कळ श्रीमंती असली तरी मायेचीं माणसें जर एक किंवा दोनच असलीं, तर अशा अडचणीच्या वेळीं केवढा तरी त्रास होतो ! आणि त्यांची उणीव किती तरी भासते ! दादासाहेबांच्या घरीं नेहमींचीं माणसें कांहीं कमी नव्हतीं. जेवायला पंगत बसली कीं, ही येथून तेथवर बसे. परंतु प्लेग जसजसा गांवांत पसरत चालला, तसतशी एक एक मंडळी गांवाला जात चालली, आणि केवळ यांचेंच असें कोणी नसल्यामुळें अर्थातच चाकरमाणसांखेरीज दुसरें कोणी राहिलें नाहीं. चाकरमाणसांत तरी काय— कारकून तर तिघे आधींच गेले. एक उरला होता तो आठ दिवसांपूर्वींच कांहीं कारण काढून निघून गेला. गड्यांपैकीं दोघे नवीन होते आणि एक मात्र जुना; अशी स्थिति होती. त्यामुळें जें काय मायेनें करावयाचें तें करणारी फक्त वहिनीबाईच. वहिनीबाईनें आपल्या माहेरीं तार करून कोणाला तरी बोलावण्याचें मनांत आणलें, परंतु तेथून तरी कोणी येणारें होतें असें नाहीं आणि यदाकदाचित् असलें तरी या अशा खाईत कोणाला बोलवावें तरी मोठी पंचाईत. असा कांहीं प्रकार होता. तरी पण तिनें आपल्या भावाला एक तार पाठविलीच.

कृष्णराव हा फार चांगला गृहस्थ. त्यानें एखादें काम करावयाचें म्हटलें, म्हणजे मग त्यांत माघार कधीं घ्यावयाचा नाहीं आणि अशा प्रसंगीं तर तो आपल्या शरीराकडेसुद्धां पहाणारा नव्हे. त्याचें वजनही बरेंच होतें. त्यानें पेठेच्या चीफ व्हालंटिअरास जाऊन भेटून त्याला बरोबर घेऊन वरिष्ठ साहेबांची गांठ घेतली, त्यांचेकडून घरांत ठेवण्याची परवानगी मिळाली नाहीं. परंतु बाहेर अगर थोरल्या इस्पितळांत कोठें तरी तंबू देऊन स्वतंत्र व्यवस्था करण्याची परवानगी मिळाली. त्याप्रमाणें लागलीच व्यवस्था झाली. इतर कोठें बाहेर जाऊन सर्व गोष्टींची अडचण करून घेण्यापेक्षां थोरल्या इस्पितळांतच अगदीं निराळा तंबू देऊन व बरोबरीच्या मंडळीसही राहण्यासाठीं तंबू

मारून सर्व व्यवस्था केली. दादासाहेबांस द्रव्यबळ वाटेल तितकें होतें, तरी माणूसबळ नव्हतें. एकटी बिचारी वहिनीबाई किती वेळ शुश्रूषा करणार. मनुष्यशरीराला जितकें म्हणून कांहीं शक्य, तितकें तिनें केलें. बाकी सर्व भाड्याच्या माणसांवरच अवलंबून बसावें लागलें. पण तिच्या नशिबानें एवढें बरें झालें कीं, भाड्याचीं माणसें मिळालीं, तीं केवळ भाड्याच्या माणसांप्रमाणेंच मिळालीं नाहींत. तिची ती करुण मूर्ति पाहून ज्यांच्या अंतःकरणाला दयेचा पाझर फुटेल अशींच माणसें होतीं. दादासाहेब श्रीमंत असल्यामुळें ते आपल्या मेहनतीनें बरे झाल्यास आपल्यास खात्रीनें चांगलें बक्षीस देतील हीही पण त्यांस आशा होती.

---

# प्रकरण ५ वें.

## इस्पितळांत.

इटालिअन् कवि डांटे यानें आपल्या महाकाव्याच्या एका भागांत एका विशिष्ट लोकाचें वर्णन केलें आहे. तो लोक यमलोक होय. त्या लोकांत जाऊन त्याच्या मनाची जी स्थिति झाली, तीच स्थिति प्लेग इस्पितळांत जाणाऱ्या हिंदूंची होते. जिकडे पहावें तिकडे झोंपड्या आणि पालें, छकडे आणि हातगाड्या, खाटा आणि ब्लांकिटें, रोगी आणि डाक्तर, नर्सेस आणि वार्डआया! जें ऐकावें तें विवळणें किंवा चावळणें! ब्यूबो किंवा १०४ डिग्री ताप! रेलवेच्या जवळील गाडे-तळानजीकचा पूल उतरून गेलें, कीं दोन चार पांच सात, मधें मधें दहा बारा छकडे आंत प्रेतवत् स्थितीं झालेले रोगी आणि एखाद्या अर्ध्याजवळ एखादें अर्धें कोणी जवळ राहण्याला आलेलें माणूस; त्या छकड्यांत धड त्या रोग्याचे पाय रहात नाहींत, ते छकड्याच्या

पिछाडीच्या मागें निघालेले, आणि रस्त्याच्या उंचसखलपणामुळें किंवा बैलाच्या आणि छकडेवाल्याच्या लहरीपणामुळें जे मिनिटांतून दहा वीस अचके गचके बसतात, त्यांनीं त्या रोग्याचें शरीर आणखी खालीं सरकून पाय अधिकच बाहेर येऊं लागतात. ज्याच्या बरोबर कोणी माणूस असेल तर तें त्याच्यासाठीं छकडेवाल्याच्या विनवण्या तरी करून क्वचित् रोग्याला खालीं वर करण्यांत येतें. परंतु ज्याच्याबरोबर कोणी नाहीं, त्या रोग्यानें इस्पितळाच्या हद्दींत जाऊन नांव नोंदणीच्या जागीं जाईपर्यंत आपण रस्त्यावर घसरून पडण्याबद्दल केवळ परमेश्वरावरच भरंवसा ठेवावा लागतो. छकडा एकदां नोंदणीऑफिसाजवळ आला, कीं तेथेंच त्याला दहा पंधरा मिनिटें थांबावें लागतें आणि मग तेथून नोंदणी होऊन एकदांचे रोगी जाऊन या यमपुरींतल्या आपल्या स्थानावर आरूढ होतात. तेथें गेलें कीं, आपलें मरण्यासाठीं म्हणूनच जायचें, असा ज्याचा त्याचा ग्रह आणि पुष्कळांचा अनुभव असल्यामुळें जो तो त्याला यमपुरीच म्हणतो. परंतु वस्तुतः तेथें रोग्यास जगविण्याकरतांच सर्वत्रांचे श्रम चाललेले असतात. ज्याला कोणी नाहीं, त्याला सरकार धनी. सरकारी नौकर त्याची व्यवस्था करतो. सरकारी डाक्तर त्याला औषध देतो. सरकारी नर्स त्याला पथ्यपाणी करते. अर्थातच त्यांच्या नजरेखालीं शेंकडों रोगी आणि अंतःकरणांत जिव्हाळ्याचें नातें नाहीं तेव्हां फक्त त्या सर्व करण्यांत प्रेमाचीच कायती वानवा असते. पण ती कशी यावी? खाटेशेजारीं खाट! कोणी विवळतो, तर कोणी चावळतो! कोणी क्षणोक्षणीं क्षीण होऊन हातपाय हलविण्याची सुद्धां त्यास ताकद रहात नाहीं, तर कोणी वायूच्या लहरीनें आलेल्या उसन्या शक्तीनें धांवाधांव करूं लागतो! परंतु त्यांतल्या त्यांत जे कांहीं बेतावर असतात, त्यांची एकमेकांविषयीं सहानुभूति उत्पन्न होते. समदुःखी असल्याकारणानें आपलीं दुःखें विभागून घेतात. भाडोत्री वार्डबॉयनें

दुसऱ्या कोणास धसकफसकपणानें वागविल्यास त्याच्याशीं भांडण्यास तयार होतात. सारांश, जी यमपुरी म्हणून प्रथमतः त्यांस वाटून ते अगदीं नाखुषीनें तेथें आलेले असतात, तीच त्यांस अनुभवानें तितकी असह्य वाटत नाहींशी होते. हें इस्पितळ आम्हां हिंदूंच्या दृष्टीनें यमपुरी होय. परंतु तेथल्या व्यवस्थेच्या मानानें खरोखर यमपुरी नव्हे. इस्पितळांत जाऊन औषधपाणी करून घेणें हें अद्यापि आम्हां हिंदूंना अंगवळणीं पडलें नाहीं आणि त्यामुळें गरीबगुरीबांच्या घरच्यापेक्षां येथें किती तरी सुव्यवस्था असली— आणि ती असते यांत तिळमात्र संदेह नाहीं—तरी ती आम्हांला बरी वाटत नाहीं, हा जन्मादारभ्य अभ्यास नसल्याचा गुण आहे. इस्पितळांतल्या व्यवस्थेकडे तिचा दोष नाहीं हेंच खरें. एका काळजाच्या मायेखेरीज येथें सर्व कांहीं होतां येईल तों अलिकडे पलीकडे मिळतें.

यमपुरीची उपमा या इस्पितळास एवढ्यापुरतीच कीं, तेथें जो जातो, तो आपण परत येऊं अशा आशेवर पाणी सोडूनच जातो. मग तो आलाच तर त्याचें दैव मोठें, असें त्याला आणि इतरांनाही वाटतें. येथें खायला नाहीं, कीं प्यायला नाहीं, औषध नाहीं कीं पाणी नाहीं ? काय नाहीं ? सर्व कांहीं इतक्या अजस्त्र प्रमाणांत मिळावयाचें तसें मिळतें. परंतु रोगच असा भयंकर कीं, त्याला आजपर्यंत औषध म्हणून निघालें नाहीं. हा यमदूतच असा कीं, तो कोणच्याही सामोपचारानें विनविलें, तरी होतां होईल तों आपलें वारंट बजावल्यावांचून रहायचा नाहीं ! असो; परंतु आपणास आतां सगळ्या इस्पितळभर हिंडावयाचें नाहीं. एका विवक्षित ठिकाणीं जायचें आहे. ब्राह्मणांच्या वार्डांतल्या बऱ्या होणाऱ्या लोकांत एक मुलगा बसला होता. त्याचा चेहरा या वेळीं फार आनंदित दिसत होता. त्याला सोडणार होते. आणि गांवाहून त्याचें कोणी जिव्हाळ्याचें माणूस सकाळींच आलें होतें. तो त्या मुलाचा बापच होय. सकाळीं आगगाडीच्या

स्टेशनावर उतरून तो तडक इस्पितळांत आल्याबरोबर त्यानें आपल्या मुलास पाहिलें आणि त्यानें त्याला एकदम आपल्या पोटाशीं धरलें. तेव्हां त्याच्या डोळयांतून जे आनंदाश्रु वाहिले, ते पाहून त्या वार्डां-तल्या इतर रोग्यांस फार गहिंवर आला यांत कांहीं नवल नाहीं. परंतु तेथें तसले व इतर प्रकारचे अनेक देखावे पाहून ज्यांचें मन अगदीं निगर्गट्ट बनलें आहे, असे जे वार्डबाया व वार्डअय्या. डाक्तर आणि नर्सिस त्यांना सुद्धां तो मौजेचा देखावा पाहून गहिंवर आल्याखेरीज राहिला नाहीं. एका वार्डबायूनें त्या मुलाला धांवत धांवत जाऊन एक नारिंग आणून दिलें. एका तेथून जवळून जाणाऱ्या कुळंब्याच्या बाईनें जवळ जाऊन त्या मुलाच्या अंगावरून हात ओवाळून बोटें मोडलीं, त्याला फलाणीची बेंडी घालायला देणाऱ्या त्या वार्डावरल्या नर्सलाही त्याचें आनंदानें प्रफुल्ल मुख पाहून फार कौतुक वाटलें, आणि "O! he looks so happy now!" असा उद्गार काढला. त्याच वार्डांत दुसरा एक आजच सुटणारा गृहस्थ होता. त्यानें आपल्या धोतरानें आपले डोळे पुसले. इतक्यांत मुलाला सोडून तो बाप त्या गृहस्थाजवळ आला, आणि त्याच्यापुढें हात जोडून त्याला म्हणतो, "महाराज! आपले उपकार मी जन्मजन्मांतरींसुद्धां विसरणार नाहीं. अशा आपल्या स्थितींत आपण तारेकरितां खर्च करून मला तार केलीत. दोन दिवसपर्यंत या मुलाच्या ऐनतापाच्या भरांत खस्ता खाल्यात, तें सर्व माझ्या मुलानें मला सांगितलें. इतकी या मुलाची काळजी घेतलीत, याच्याबद्दल मी उपकार कुठें फेडूं! आपली तार मला खरी वाटेना सुद्धां. कारण जिकडून कळायचें तिकडून कांहींच नाहीं. आणखी परक्याकडून ही तार! पण गाडी निघण्याच्या बेताला पत्रही जेव्हां आलें, तेव्हां सर्व मजकूर समजला. अशा अनाथ पोराची तुम्ही अशा स्थितींत सुद्धां कींव करून खर्चाकडे पाहिलें नाहींत, तेव्हां आपला थोरपणा किती असला पाहिजे!" त्या प्रेमानें गहिंवरलेल्या

बापाच्यानें अधिक कांहीं बोलवेना. आणि त्या गृहस्थानेंही तशा गहिंवरलेल्या स्थितींतच "कांहीं नाहीं. यांत कसला थोरपणा, आणखी कसला उपकार आला आहे! या मुलाला दोन दिवसच काय तो इथें आल्यावर ताप आला. आला ते दिवशीं फार होता, दुसरे दिवशीं तसाच होता, आणि तिसरे दिवसापासून निघाला तो निघालाच. तेच दिवशीं डाक्तरांनीं याला त्या वार्डांतून इथें आणून ठेवलें. येथें बसल्या बसल्या आम्हांला उद्योग काय? मी तरी आपल्या भावाला संभाळीत होतोंच. त्यांत याच्याहीकडे पाहिलें. तो बोलूं लागल्यावर त्याच्याकडून हकीकत कळली. तेव्हां तर आपल्याला फारच आश्चर्य वाटलें आणि त्याच्याकडे मन ओढलें. तेव्हां आपल्याला पत्र लिहिलें. आणि "दुसरे दिवशीं मुलाला सोडूं" असें संध्याकाळीं डाक्तर म्हणाले तेव्हां तार केली! माझ्या पत्रावरून आपल्याला सगळी हकीकत कळलीच आहे. आपल्या गांवाकडेच माझंही जाण्याचं ठिकाण आहे. आपण आज बरोबरच जाऊं. मलाही पण आजच सोडणार आहेत. मी इथें आमच्या या बंधूंना घेऊन कांहीं जरूरीच्या कामाकरतां म्हणून आलों होतों. एकच दिवस किंहो एका खानावळींत जाऊन जेऊन काम करून संध्याकाळच्या गाडीनं परतलों, तों स्टेशनावर हाततपासणींत हा अडकला आणखी इथें आला. तो आठ दिवस कुंथत पडला होता. पण माझें नशीब चांगलें, कीं याचा बारीक ताप दुसऱ्या कांहीं थरावर गेला नाहीं. तो जर का तसा जाता, तर मोठीच पंचाईत झाली असती. कांहीं रकमेचा वसूल करण्यासाठीं आम्ही आलों होतों. दिवस अशा प्रकारचे म्हणून एकास दोघे आलों. वसूल न होणारी रक्कम वसूल झाली. आणखी म्हटलं हें लचांड काय होतं आहे कोणाला ठाऊक!"

याप्रमाणें त्या दोघांचें बोलणें होऊन थोडा वेळ झाला नाहीं, तोंच थोरले डाक्तर येऊन त्यांनीं त्या दोघांस एकदां तपासून जाण्याची

सर्टिफिकिटेंही करून दिलीं. त्याबरोबर त्या चौघांस कितीतरी आनंद झाला ! त्या चौघांसही ज्या गाडीनें जायचें होतें, ती गाडी एका तासानेंच जाणारी होती. त्या मुलास, त्याच्या बापास किंवा त्या दोघां गृहस्थांस—कोणासच गांवांत जाण्याची इच्छा नव्हती. अर्थातच ती मंडळी स्टेशनाजवळच्या खाणावळींत जेवणखाण करून आपल्या गाडीच्या वेळीं स्टेशनवर जाऊन आपल्या गांवास—बेळगांवास—निघून गेली. मुलानें व मुलाच्या बापानें आग्रह करून त्या दोघां गृहस्थांस बेळगांवास आपल्या घरीं चार दिवस ठेवून घेतलें. व जातांना पुनः त्या मुलाच्या बापानें त्या गृहस्थांस आपण हा मुलगा माझा मला परत दिला, हे उपकार मी जन्मजन्मांतरींसुद्धां विसरणार नाहीं असें गहिंवरून म्हटलें. त्यांनेंही समयोचित असें उत्तर देऊन ते दोघे गेले. त्या मुलास पाहतांक्षणीं त्याच्या आईस केवढा आनंद झाला असेल, याचें वर्णन करणें मला शक्य आहे काय ?

ज्या दिवशीं ही दोन मंडळी सुटली, त्याचे आदले दिवशीं दादासाहेबांस इस्पितळांत आणण्याची व्यवस्था झाली होती आणि दादासाहेबांस आणलेंही होतें. त्यांचेजवळ त्यांची पत्नी अगदीं डोळ्यांत तेल घालून जागृतीनें त्यांची काळजी घेत होती. सगळ्यांत उत्तम डॉक्टराला फी भरून आणला होता. त्यानें त्यांच्या बरें होण्याची थोडीशी आशा आहे, असें सुचविलें होतें. यामुळें मंडळीच्या चेहऱ्यांवर त्यांतल्या त्यांत थोडासा आनंद दिसूं लागला होता. दादासाहेबही चांगले हुशार होते. इस्पितळांतल्या तंबूंत येऊन चार तास झाले नाहींत, तोंच त्यांच्या मनांत एकदम कांहीं विचार आला, आणि त्यांनीं आपल्या बायकोस जवळ बोलावून तिचा हात धरून तिला म्हटलें, “ हें बघ. प्रसंग येईल तशी पाठ दिली पाहिजे. तूं अगदीं धीर सोडूं नकोस. डाक्तराच्या म्हणण्याप्रमाणें मी जर बरा झालों, तर ठीकच आहे. नाहींच झालों तर... ”

परंतु वहिनीबाई त्यांना अधिक बोलूं देईनात. " तुमच्या पायां पडतें, असलं बोलणं आतां कांहीं नको. डाक्तरांनीं अर्ध्या अर्ध्या तासानं पोटीस करायला सांगितलं आहे तें करूं द्या मला. " असें म्हणून आपले अश्रु पुशीत पुशीत ती लागलीच बाहेरल्या बाजूस शेगडी होती तेथें गेली.

दादासाहेबांच्या मनांत जो विचार आला होता, तो यावेळीं इतका अनावर झाला होता कीं, त्याच्यापुढें त्यांस कांहीं सुचेना. त्यांनीं आपल्या एका विश्वासू मनुष्यास बोलवून आणून, " आधींच्या आधीं बंगल्यांत जाऊन त्रिंबकरावमामांस बोलावून घेऊन या " म्हणून सांगितलें. " जसे असाल तसे निघून या म्हणून त्यांना सांग—आणखी बरोबर छोटूलाही घटकाभर—पण नको, छोटूला नको आणायला सांगूं " असें आणखी ते म्हणाले. तो मनुष्य धांवत गेला.

त्रिंबकराव आपल्याशींच कांहीं विचार करीत होते. आणि छोटू " आई, आई " करून रडत होता. गंगाबाई त्याची समजूत करीत होत्या. त्रिंबकरावमामा ज्याबद्दल विचार करीत होते, तो विषय फ़ार—म्हणजे अतोनातच—गहन होता. इतका गहन होता कीं, त्याचें समीकरण अजून मोठमोठ्या डाक्तरांना सुद्धां सुटलें नाहीं. आज तीन चार वर्षें हिंदुस्थानांत आणि त्याच्या पूर्वीं चिनांत आणि त्याच्या पूर्वीं आणखी कोठें असा प्लेग सुरूच आहे. त्याबद्दल जितकी विचक्षणा व्हावयाची, तितकी थोरलाले जंगी एम्. डी., एल्. आर्. सी. पी., आर. ए. एस्, सी., ए. बी. सी. डी. ई. एफ्. जी. एच्. आणि इंग्रजी वर्णमालेंतील बहुतेक अक्षरांचीं सर्व प्रकारचीं एकीकरणें आणि अक्षरपाश पदवीरूपानें मिळविलेले सर्व डाक्तर करीत आले आहेत. परंतु अजून हा रोग उद्भवतो कसा आणि पछाडतो कोणाला, याचें कायमचें निदान ठरवितां आलें नाहीं. हा रोग स्पर्शजन्य आहे, कीं संसर्गजन्य आहे ? भूमिजन्य आहे, कीं वातावरणजन्य आहे ? आहे

तरी कसा ? अमक्याला तो खात्रीनें होईल आणि तमक्याला होणार नाहीं, असें कसें समजावें ? तें समजणें शक्य आहे काय ? हे सर्व प्रश्न अद्यापि वेदांताच्या आदिम प्रश्नांप्रमाणेंच अज्ञात आहेत. ज्याप्रमाणें मानवी प्राणी आपल्या स्वत:बद्दल "कस्त्वं ? कोऽहं ? कुत आयात: ?" असें विचारून स्वस्थ बसतो, त्याचप्रमाणें या प्लेगाच्या बाबतींतही "हा काय रोग ? येतो कोठून ? आणि धरील कोणाला ?" असें विचारून विचारून अजूनपर्यंत तर स्वस्थच आहे. संसारांतून मुक्ति मिळण्याला ज्याप्रमाणें एक परब्रह्माचाच आश्रय, त्याप्रमाणें या प्लेगांतून मुक्ति मिळविण्याला सुद्धां तेवढाच आश्रय आहे, दुसरा कांहीं नाहीं, असें साधारण जनसमूह म्हणून स्वस्थ बसतो. असो; परंतु आपल्याला त्रिंबकरावमामाच्या विचाराकडे पहावयाचें आहे. त्यांत हा वेदांत कशाला ?

त्रिंबकरावमामा याचसंबंधानें विचार करीत होते. हा रोग एकंदरींत संसर्गजन्य आहे कीं काय ? संसर्गजन्य म्हणावा तर डाक्तरांना कां होत नाहीं ? रोगी नेणाऱ्या छकडेवाल्यांना, त्यांचे घाण झालेले कपडे धुणाऱ्या भंग्यांना, इस्पितळांतल्या नौकरांना कां होत नाहीं ? घरांत दहा माणसें असलीं तर कांहीं माणसांना मात्र होतो, इतरांना त्यांचा चांगला संसर्ग झालेला असून ते कां त्याच्या तडाख्यांतून सुटतात ? जर कांहींना होतो आणि कांहींना होत नाहीं असें असलें, तर आपण कोणच्या कोटींत आहों ?" या प्रश्नांचा ऊहापोह स्वारींच्या मनांत एकसारखा चालला होता. या ऊहापोहाच्या भानगडींत पडण्यास त्रिंबकरावमामा कांहीं डाक्तर नव्हते, किंवा जंतुशास्त्राच्या विशेष अभ्यासाची त्यांस गोडी नव्हती, परंतु याचा लागलीच निकाल करून—आणि तो आपण या प्लेगाच्या तडाख्यांत न सांपडणाऱ्यांपैकीं आहों, असें ठरविणें त्यांना अगदीं आवश्यक वाटत होतें. दादासाहेबांस प्लेग झाला आहे. आणि आपण त्यांच्याजवळ बसण्याला नाहीं, हें त्यांस अगदीं गैर दिसू

लागलें. आपण आपल्या जीवाच्या भयामुळें त्यांचेजवळ जात नाहीं असा दादासाहेबांचा किंवा कोणाचाच समज होऊं नये अशी त्यांस उत्कट इच्छा. आणि ती इच्छा व आपण त्यांचेजवळ न जाण्याची इच्छा या दोनही इच्छा सफळ करण्याच्या बुद्धीनें त्यांनीं छोटूला संभाळण्याची युक्ति काढली. ती सफळही झाली. परंतु मनुष्याचा स्वभावच हा, कीं जोंपर्यंत एखादी इच्छा सफळ व्हावी अशी असेल, तोंपर्यंत तिच्यासाठीं धडपड. पण ती एकदां झाली, म्हणजे मागोमाग दुसरी इच्छा थडकतेच. आपला भित्रेपणा दादासाहेबांच्या ध्यानांत न येतां आपण त्यांच्यासाठीं कायावाचामनानें झटतों असें तर त्यांना वाटावें, आणि त्यांच्याजवळ जाऊन बसण्याचा प्रसंग टळून आपला जीव तर बचवावा, ही इच्छा सफल झाली, तेव्हां लागलीच त्यांस आपण हें केलें हें बरें केलें नाहीं, असें वाटूं लागलें. त्यांना असें वाटूं लागलें कीं, प्लेगाचा आजार हा, तेव्हां आपला शेवट कसा होतो, आणि कसा नाहीं हा त्यांना विचार पडायचाच. विचार पडला कीं, ते त्याबद्दल कांहींतरी पुढें विचार करणारच. आणि अशा महत्त्वाच्या विचाराच्या वेळीं जर आपण त्यांचेजवळ नसलों, तर मग आपल्या स्नेहाचा उपयोग काय? त्यांना छोटू हा एकुलता एकच मुलगा, हें सगळ्या जगाला माहिती. बाकी जगांत दुसरें कोणी त्यांना नात्याचें कीं गोत्याचें नाहीं. जीं आहेत तीं त्या मुलाच्या आजोळचीं. पण तीं त्या मुलाचें नीट संगोपन करतील असें कशावरून? जगांत लोक लुच्चे म्हणजे कोण! दादासाहेबांनीं आपलें वुइल करून आपल्याला ट्रस्टी म्हणून आंत शिरकायला सांपडावें ही इच्छा धरून आतांच तेथें त्यांच्याभोंवतीं लोक जमले असतील. तर त्या लुच्चे लोकांस तसें करण्याची सवड देतां उपयोगी नाहीं. पण आपण तेथें जावें कीं न जावें? प्लेग जर आपल्याला खात्रीनें होणार नसेल, प्लेग न होणाऱ्या लोकांपैकीं जर आपण असलों, तर आपण जाण्याला मुळींच हरकत

नाहीं. पण मला वाटतें, प्लेग न होणाऱ्या लोकांपैकींच आपण एक आहोंत. कारण असें कीं, पहिल्या प्रथम त्या आपल्या घरांत त्या मालकाची सून लागली, आपण लागलों नाहीं. त्याच्या घरांत विष आलें असेल, आपल्या घरांत नाहीं असें समजूं. पण मग आपल्या घरांत तें पोर लागलं— खरंच त्याच्या बापाला एक पत्र खरडलं पाहिजे— तेव्हांही आपल्याला कांहीं झालं नाहीं. तेथून आज इकडे दादासाहेबांच्या घरांत आलों, तरी सुद्धां आपल्याला कांहीं झालेंच नाहीं. तेव्हां मला असेंच वाटतें कीं, आपल्याला कांहीं प्लेगाची बाधा होऊं शकत नाहीं. जर असें आहे, तर आपण एकदां जाऊन या दादासाहेबांच्या वुइला-करितां कां कांहीं खटपट करूं नये ? हो, ते वुइल न करतांच वारले, तर आमच्यासारख्या त्यांच्या निकट स्नेह्याचा उपयोग काय ? बरें, आपण गेलों नाहीं आणि त्यांनीं कोणातरी लुच्चे लोकांच्या फस-वणुकीनें समजा वुइल करून टाकलें, तर मग काय उरलें ? येऊन जाऊन आपल्याला काय ती जिवाचीच भीति. पण ती इतकी अशा कामांत कां बाळगावी, मला समजत नाहीं. तें कांहीं नाहीं. आतां जाऊन आपण आपलें कर्तव्य जरूर केलेंच पाहिजे. अशा प्रकारच्या धोरणापर्यंत स्वारीची विचारमाला आली. स्वारींनीं सर्व गूढ प्रश्नांचा निकाल केला कीं, हा रोग स्पर्शजन्यही नाहीं आणि संसर्गजन्यही नाहीं. हा कांहींना होतो, कांहींना होत नाहीं. आपल्या आजपर्यंतच्या अनुभवावरून तो आपल्याला होणार नाहीं, एवढ्याकरितां आपण आतां तिकडे एकवार जाऊन काय हालहवाल आहे ती पहावीच.

योगायोग कांहीं विचित्र असतात. त्रिंबकरावमामांचा विचार या स्थितीला आणि दादासाहेबांकडून बोलावणें येण्याला एकच गांठ पडली. त्रिंबकरावमामा आतां एकवार जावेंच असा निश्चय करण्याला आणि तो दादासाहेबांचा विश्वासू इसम. “ त्रिंबकरावमामा, चला चला, आपल्याला एकवार जसे असाल तसे येऊन ज़ा म्हणून सांगितलें आहे.

आपल्याला घेऊनच यायला मला बजावलं आहे. आंत येतां येतां मीं कोचमिनाला गाडी जोड म्हणून सांगूनच पुढें आलों. छोटूरावांना सुद्धां आणावं असं त्यांच्या मनांत होतं. त्यांनीं तसं आपल्याला सांगायला सुद्धां सांगितलें होतें, पण मध्येंच त्यांचें मत बदलून त्यांनीं नको, छोटूरावाला आणूं नको, म्हणून सांगायला सांगितलें."

"कांरे ? कांरे ? दादासाहेबांचं कसं आहेरे ?" असे दोन व्यक्तींच्या ओठांतून प्रश्न निघाले, एकीचे ओंठ तो प्रश्न विचारण्यास अगदीं उत्सुक होते, कारण आज सबंध दिवसांत त्या व्यक्तीला दादासाहेबांच्या प्रकृतीचें कांहींच कळलें नव्हतें. आणि दुसरी व्यक्ति तें ऐकतांच ताबडतोब उत्सुक झाली. कारण अशा घाईनें बोलावणें म्हणजे तसेंच जलदीचें—आपल्या मनांत आहे तसलेंच— कारण असलें पाहिजे, असें तिच्या मनांत आलें. दादासाहेबांस इस्पितळांत नेल्या वेळेपासून—गंगाबाईचें मन अतिशय उद्विग्न झालें होतें. तिला कांहीं सुचत नव्हतें. मन चिंती तसें वैरि न चिंती म्हणतात त्याप्रमाणें तिच्या मनाची स्थिति झाली. अनेक अनेक वाईट विचार मनांत आले. वहिनीबाईंची मूर्ति निरनिराळ्या प्रकारांनीं तिच्या डोळ्यांसमोर दिसूं लागली. दिवसांतून तीन चार वेळां तरी तिकडील बातमी आणावी असें तिनें आपल्या नवऱ्यास सुचविलें व त्यानें आपल्या रीतीप्रमाणें तिला "बरं बरं. ह्या संबंधांत आपल्याला बोलण्याची मुळींच जरूर नाहीं," असें सांगितलें व दोन दोन तीन तीन तासांनीं त्यांच्याकडील कांहीं बातमी आली का ? असें एकदां दोनदां विचारल्यानंतर तिसऱ्या खेपेस त्यानें तिला अतिशय अपमानकारक असे शब्द उच्चारून तिचें मन दुखविलें होतें, यामुळें आतांपर्यंत तिनें त्याला पुनः त्या बाबतींत प्रश्न विचारला नाहीं. आतां तिकडला मनुष्यच प्रत्यक्ष आलेला तिनें पाहिला, तेव्हां तिच्यानें राहवेना. म्हणून तिनें त्यास वर सांगितलेला प्रश्न केला. तरी त्रिंबकरावमामांनीं

तिच्याकडे क्रूर दृष्टीनें पाहिलेंच पाहिलें. अधिक कांहीं करण्यास त्यांस वेळ झाला नाहीं. इतक्यांत गाडी जोडून तयार आहे असा निरोप आला. त्याबरोबर स्वारी उठून चालती झाली.

जोंपर्यंत गाडी इस्पितळापासून दूर होती, तोंपर्यंत त्रिंबकरावमामांस " काय हरकत आहे आपण गेलों म्हणून ? आपल्याला कांहीं होणार नाहीं, " असें वाटत होतें. परंतु जसजशी गाडी आपल्यांतील व इस्पितळांतील अंतर कमी कमी करीत चालली असें त्यांच्या नजरेस येत चाललें, तसतसा त्यांस आपल्या त्या वाटण्याला आधार फारसा नाहीं असेंच वाटूं लागलें. आणि पुढें जावें कीं परतावें असा प्रश्न वारंवार त्यांच्या मनांत येऊं लागला. होतां होतां अगदीं इस्पितळाच्या जवळ गाडी येऊन पोहोंचली, तेव्हां तर त्यांना आपण बरें केलें नाहीं असेंच वाटूं लागलें. आणि अगदीं त्या इस्पितळांत शिरण्याच्या बाजूला वळले तों त्यांस अशी उत्कट इच्छा झाली कीं, आतां आपण परतावेंच. प्लेग न होणाऱ्या लोकांपैकींच आपण आहों असें धरून चालणें सर्वथा योग्यच होईल असें नाहीं. काळ आहे, वेळ आहे, कोण्या मार्गानें प्लेग शिरेल याचा काय नेम सांगायचा आहे ? त्यांनीं कोचमनास परत फिरण्यास सांगण्यासाठीं मानसुद्धां बाहेर काढली पण तितक्यांत दादासाहेबांनीं गाडी आली कीं नाहीं तें पहाण्यासाठीं आणखी एक माणूस पाठविला होता तो पुढें आला व " मामासाहेब, आलांत एकदां ! ठीक झालें. आपली एकसारखी दादासाहेब आठवण करताहेत. गाडी आली कीं नाहीं तें पहायला मला त्यांनीं पाठवलं म्हणजे पहा, " असें म्हणाला. मग काय विचारतां ? स्वारींना " हो हो. निरोप पोहोंचतांच निघालोंच. मी काय तसा बसेन का काय दादासाहेबांचा निरोप आल्यावर ? " असें उत्तर देऊन उतरावेंच लागलें. ते उतरून डाव्या बाजूस दादासाहेबांचे तंबू दिले होते तिकडे स्वारी वळणार तों इस्पितळांतून बाहेर पडण्याच्या रस्त्यानें कांहीं लोक

त्यांच्याविरुद्ध दिशेस चालले होते त्यांच्यापैकीं एकाकडे त्यांची नजर गेली; आणि तो आपला मेहुणा काय असा त्यांस भास झाला. परंतु तो इथें कुठला यावेळीं ? असें त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें. पण तेवढ्या समाधानानें मन स्वस्थ होईना; म्हणून त्यांनीं पुनः पुनः त्या गृहस्थाकडे पाहिलें. पण किती तरी लोक चालले होते त्यांत तो केव्हांच दृष्टीआड झाला. तेव्हां शेवटीं तो इथें आतां कशाचा येतो ? माणसासारखीं पुष्कळ माणसें असतात, असें म्हणून त्यांनीं आपल्या प्रस्तुताकडे आपलें चित्त दिलें. त्यांना दुसऱ्या कशाकडे विशेष लक्ष्य देण्यास अवकाशच नव्हता.

## प्रकरण ६ वें.

### वुइल.

एखाद्यास एखाद्या रानांत डोळे बांधून नेऊन सोडावें आणि असें सांगावें कीं, या रानांत साप, विंचू, इंगळ्या अगदीं वाटेल तशा हिंडत असतात; वाघाच्या जाळ्या तर हाकेहाकेच्या अंतरावर आहेत. असें सांगितलें म्हणजे तो जसा दर पाऊल टाकण्याच्या वेळीं आतां आपला पाय सर्पावर पडून तो आपल्याला डसणार; नाहीं तर विंचू तरी नांगी मारणार, वाघानें तर उडी मारलीच. असें वाटून त्यानें कुठेंही जाण्याविषयीं अतोनात अनिच्छ असावें, तशीच त्या गृहस्थाची यावेळीं स्थिति झाली. दर पावलागणिक त्याला असें वाटे कीं, आपल्या श्वासोच्छ्वासाच्या वाटेनें दहा पांच प्लेगजंतु खास अंगांत शिरले. आतां आपण घरीं जाण्याचा अवकाश कीं प्लेग होणारच. आणि एक दोन तंबू होते त्यांच्या बाजूनें याच्या अंगावर वारा येतांच मग तर विचारूंच नका. तरी पण हें आपलें भय दुसऱ्याला न दाखविण्याची मात्र उत्कट

इच्छा ! त्याचे पाय पुढें टाकण्यास त्याला धीर नव्हता, तरी त्यानें ऐटीनें पुढें पाऊल टाकलें. चेहरा अगदीं भयानें कोमेजून गेला होता; तरी तो आपल्याकडून त्याजवर धैर्याची कळा आणण्याला धडपडतच होता. शेवटीं स्वारी तंबूच्या तोंडाशीं गेली. दादासाहेबांचे कान अगदीं येणाराजाणाराच्या चाहुलीकडेच होते. त्यांनीं लागलीच, 'कोण ? त्रिंबकराव ?' असा प्रश्न केला. त्याबरोबर त्यांनीं कांपऱ्या कंठानें "हो ऽऽ" असें उत्तर दिलें. त्यांनीं 'आंत या' म्हटल्याबरोबर बिचाऱ्याचे पाय तेथेंच गळाठण्याची वेळ आलीसें दिसलें. परंतु जेमतेम दोनही पाय आंतल्या बाजूस गेले आणि शरीरही गेलें. सुदैवाची गोष्ट कीं, तेथें दारांतच एक खुर्ची होती, तीवर स्वारी आधारली आणि बसली. तितक्यांत दादासाहेबांनीं तेथें दुसरे चाकरनौकर होते त्यांस दूर जाण्यास सांगितलें आणि त्रिंबकरावमामांस आपल्याजवळ बोलावलें. त्रिंबकरावाची नुसती भंबेरी उडाली. त्यांनीं एका इंचाच्या नव्याण्णव शंभरांशाच्या इतकी खुर्ची पुढें ढकलली. तेव्हां दादासाहेब त्यांस 'अगदीं जवळ या' असें म्हणाले. त्याबरोबर करतो काय ? गृहस्थास नाहीं म्हणण्याची प्राज्ञा नव्हती. गेला बिचारा जवळ. पण त्यांच्या कपड्यांचा आपल्या खुर्चीला स्पर्श सुद्धां होऊं नये अशी काळजी त्यानें चालविली तों दादासाहेबांनीं आपल्या हातांत त्याचा हात धरला. आणि तो तसाच धरून व त्यांस जरा मान खालीं करण्यास सांगून ते आपल्या क्षीण आवाजानें आपलें बोलणें दुसऱ्या कोणास ऐकूं येऊं नये या हेतूनें म्हणतात, "त्रिंबकराव, परवां तुम्ही माझी परीक्षा पहाण्याला आलां. आतां मी तुमची पहाणार. मला झाला आहे प्लेग यांत शंका नाहीं. आणि या प्लेगाचं म्हणजे कांहीं खात्रीनं धोरण समजतं आहे असं नाहीं. काळजाशीं संबंध फार. मनुष्य चांगला आहे चांगला आहे असें म्हणतां म्हणतां पटकन तिसरंच कांहीं होतं; तेव्हां आपल्याकडून

सावध असावें तें चांगलें. एवढ्याकरितां तुम्हाला बोलावलें. तर कांहीं व्यवस्थापत्र करायचं आहे. तें तुम्ही ल्याहा. मी आपली इच्छा काय ती तुम्हांला कळवतों म्हणजे झालं." असें म्हणून त्यांनीं खालील अर्थाचा मजकूर सांगितला:- "प्रथमतः स्थावरजंगम इस्टेटीची यादी सांगितली, नंतर देण्याघेण्याची यादी आठवली तेवढी सांगितली. बाकीची जमाखर्चाच्या वह्यांवरून समजेल म्हणून सांगितलें. नंतर त्रिंबकराव व आपली बायको यांस ट्रस्टी नेमून त्यानीं छोटू मोठा होईपर्यंत सर्व इस्टेटीची वहिवाट करावी असें लिहिण्यास सांगितलें. छोटू मोठा झाल्यावर आईच्या तंत्रानें राहिल्यास ठीकच, नाहीं तर तिला रुपये ५० दरमहा त्यानें द्यावे. मोठा होईपर्यंत तिनें आपला व त्याचा खर्च ७५ पासून शंभरांत करावा. आजपर्यंत रहात आलों तसें रहावें. आणि तो जितके दिवस शिकेल तितकें त्यानें शिकावें वगैरे वगैरे. या सर्व त्रासाबद्दल त्रिंबकरावांस अमुक एक रकम द्यावी असें एक कलम त्यांनीं घालण्यास सांगितलें. परंतु तें ऐकतांच त्रिंबकरावांनीं एकदम 'छे! छे! छे! छे!' असें करून कानावर हात ठेवून 'तें ऐकणें सुद्धां अंगावर शहारे आणतें?' असें बोलून ठेविलें. इतकें सगळें झाल्यानंतर त्रिंबकरावास त्याचा मसुदा करण्यास सांगितलें. परंतु उद्यां करून आणतों म्हणून त्यांनीं उत्तर दिलें. "नाहीं. नाहीं. उद्यांचा नेम काय? आजच्या आज केलें पाहिजे." असा दादासाहेबांनीं आग्रह केला. ट्रस्टीजूचें कलम सांगेपर्यंत बिचाऱ्या त्रिंबकरावाचें चित्त त्यांच्या त्या सांगण्याकडे मुळींच नव्हतें. सगळें चित्त आपण जाऊं केव्हां इकडे होतें. आणि बिचाऱ्यास मधून मधून इथें दुखलें, जांगाडांत चमक मारली, कांखेंत शिलिक निघाली, असें पंचवीस वेळां वाटलें. तितक्या वेळां त्यानें त्या त्या जागा चेपून चापसून पाहिल्या. दहा पंधरा वेळां ताप भरलासें वाटलें. तितक्या वेळीं पोटाला हात लावून पाहिलें आणि पांचचार वेळां आपली नाडी

तपासून पाहिली. परंतु ट्रस्टींत आपलें नांव आहे असें ऐकतांच त्याला थोडें त्यांत मन घालावेंसें वाटलें. आणि साहजिकच तितकें मन इकडल्या या विचारांकडून काढून घ्यावें लागलें. सांगायचें तितकें सांगून झाल्यानंतर दोन चार तासांच्या आंत मृत्युपत्र चांगलें लिहून सही करायला आणतों असें सांगून तो तेथून निघून गेला. तेव्हां त्याला किती तरी सुटल्याप्रमाणें झालें. आणि त्यांतही आपण जो विचार करीत होतों त्याच विचाराबद्दल एकंदर काम होतें, त्यामुळें जातांना जितकें प्लेगाबद्दल भय वाटत होतें व त्यामुळें त्याचें मन अस्वस्थ होतें, तितकें कांहीं येतांना तें अस्वस्थ नव्हतें. जातांना तें रिकामें होतें. येतांना तें बरेंच तुडुंब भरलेलें होतें. बंगल्यांत येण्याबरोबर ते लिहिण्यास बसलेच. दादासाहेबांनीं सांगितल्याबरहुकूमच सर्व व्यवस्था लिहिली गेली. मात्र मात्र—परंतु तें ‘ मात्र ’ आतांच नको. हें सर्व ते आपल्याकडून करीत होते खरे, परंतु सकाळीं कोणा इसमास पाहून त्यांस जो काय भास झाला, तो मधून मधून मनांत येऊन त्यांच्या मनास कांहीं निराळ्याच प्रकारची अस्वस्थता आली. व ते त्याचसंबंधानें विचार करीत पांच पांच दहा दहा मिनिटें अगदीं थबकून बसत. पण दुसरे दिवशीं सकाळीं त्यांच्या मेहुण्याकडून त्यांस एक पत्र आलें. त्यांत “ आपल्याकडून किती दिवसांत पत्र नाहीं. पुण्यांत हल्लीं प्लेग फार जारीनें सुरू आहे. शंभरापर्यंत रोज केसेस् होतात, तर तुम्ही सर्वच मंडळी इकडे या, हल्लीं इकडे प्लेग नाहीं. आणि चि० कृष्णाच्या व आपल्या दोघांच्या खुशालीचें पत्र ताबडतोब पाठवा ” असें लिहिलें होतें. तें पत्र वाचतांच आदले दिवसाचा भास केवळ वृथा होय असें पक्कें वाटून त्यांचें मन अगदीं स्वस्थ झालें. नंतर लागलीच त्यानें कृष्णास प्लेग झाला व त्याच्याकरितां आपण अनर्थापात खटपट केली असतांही दुर्दैवानें त्याला देवाज्ञा झाली असें सविस्तर व हृदयद्रावक असें पत्र लिहून त्यानें तें टपालांत टाकलें.

त्याच दिवशीं दादासाहेबांची प्रकृति अधिक बिघडली. ते अजून चांगले शुद्धींत होते, परंतु त्यांच्या अंगांत ताप फार आहून तापाच्या मानानें नाडीचे ठोके तर फारच जलद परंतु क्षीणपणें पडत होते. डाक्तरानें आदल्या दिवसाइतके आशेचे उद्गार काढले नाहींत. वहिनीबाईंचाही आतां धीर थोडासा सुटला, परंतु तिनें तसें बाहेर दाखविलें नाहीं. नवऱ्याची जी काय शुश्रूषा करावयाची, तींत अणुमात्र तिनें कमतरता होऊं दिली नाहीं. आंतून सगळें अंतःकरण जरी करपून गेलें होतें, तरी त्या करपण्याची कळा चर्येवर दिसूं नये म्हणून जितकें कांहीं करवलें तितकें तिनें केलें. स्वस्थ बसलें असतां मन उद्विग्न होऊन त्यांत नानाप्रकारचे वाईट विचार येतात, म्हणून तिनें कांहींना कांहीं तरी खटपटींत आपल्या स्वतःस गुंतवूनच घेतलें. नवऱ्याजवळ बसलेली असे, परंतु तिनें त्याला बोलूं देऊं नये. एक वेळां एक गृहस्थ समाचाराला आला असतां मागली व्यवस्था कशी काय केली आहे ? नसली केल्यास कांहीं तरी करावी असें त्यानें सुचविलें, तर तिनें त्याला तेथून उठवून लाविलें. तिचें ध्यान चित्त सगळें त्या प्राण्याकडे लागलें होतें. आपण आदले दिवशीं त्रिंबकरावाला काय लिहिण्याला सांगितलें होतें, तें तिला ठाऊक व्हावें म्हणून दादासाहेब सांगूं लागले, तर तिनें त्यांस सांगूं दिलें नाहीं. अशा स्थितींत दादासाहेब असतां त्रिंबकरावांनीं पुनः एकदां हिय्या करून इस्पितळाकडे गाडी आणली. आदले दिवशींच्या तेथें बसण्यानें वगैरे कांहीं अजून झालें नाहीं असें पाहून स्वारीचें चित्त जरा आज अधिक निर्ढावलें. आणि आदल्या दिवसाइतका घाबरलेपणाही त्यांच्या चर्येवर दिसत नव्हता. ते तडक दादासाहेबांकडे आले. त्याबरोबर दादासाहेबांना अंमळ समाधान झाल्याप्रमाणें दिसलें. आणि त्यांनीं तो कागद काल लिहून आणणार होतां तो आणला नाहींत, आज तरी आणलात का म्हणून त्यांनीं विचारलें. त्रिंबकरावांनीं अगदीं उद्विग्न

चेहरा करून, " आग्रहच तुमचा पडला तेव्हां आणला आहे. पण वहिनीसाहेबांना एकदां त्यांतला मजकूर ऐकूं देऊन मग काय सही करायची ती करा, " असें म्हटलें.

" नको. नको. मला तें ऐकायला नको. आणखी माझ्या दृष्टीस सुद्धां तो पडायला नको, " असें वहिनीबाई आपले अश्रु पुशीत म्हणाल्या.

" वेडी आहेस तूं ! वाचा हो तुम्ही. आणखी तूं ऐक, " दादा-साहेब अंगांत आवांका नसतांही जरा जास्त मोठ्यानें वहिनीबाईंना म्हणाले.

त्या बिचाऱ्या मुकाट्या बसल्या. त्रिंबकराव वाचूं लागला. परंतु इस्टेटीची यादी ऐकतां ऐकतां वहिनीबाईंस आपलें चित्त आवरेनासें होऊन त्या मोठ्यानें रडूं लागल्या. तेव्हां दादासाहेबांनीं " वाचण्याची जरूरीच नाहीं " असें म्हणून त्रिंबकरावांपाशीं दऊत लेखणी मागून सही केली. वुइल वाचून सुद्धां पाहिलें नाहीं. त्रिंबकरावांची इच्छा तीच होती काय ?

त्या संध्याकाळीं दादासाहेबांची प्रकृति अधिक बिघडली. त्यांचा ताप फार वाढला आणि त्यांस चांगलाच वायु झाला. हांक मारली तर ओ देण्याची किंवा जीभ काढा म्हटलें तर जीभ दाखविण्याची सुद्धां त्यांस शुद्ध नाहींशी झाली. अंगाला हात लावला तर हात अगदीं भाजेल असा ताप भरला होता. आणि अस्वस्थता तर फारच होती. वहिनीबाईंचा आतां अगदीं धीर गळाला. आणि त्या धीराबरोबर त्यांचे हातपायही अगदीं गळाले. त्याचप्रमाणें त्यांनाही काय करूं आणि काय न करूं असें झालें. दादासाहेबांच्या जगण्याची आतां त्यांना आशा नव्हतीच. तीन तीनदां जवळ जात, त्यांच्या अंगाला हात लावून पहात. ताप उतरला कीं काय, आणि हाताला तो होता

तितकाच लागला, कीं निराशेनें कपाळावर हात मारून अंमळ मागें होत. पुनः मधेंच आशेची एक तिरीप उठून त्या बर्फाची पिशवी घेऊन त्यांच्या कपाळावर व डोक्यावर ठेवीत, कारण डॉक्तरानें तसें एकसारखें करीत बसण्यास सांगितलें होतें. एकीकडे एकसारखें रडूं चाललेंच होतें. इतक्यांत मध्यरात्रीच्या सुमारास एक चमत्कार झाला. दादासाहेबांनीं मोठ्यानें " अग " म्हणून तिला हाक मारली. वहिनीबाई जवळच बसली होती तिनें चट्कन् आपला हात त्यांच्या कपाळावर ठेवला, आणि " काय ? काय ? " म्हणून त्यांना विचारूं लागली. परंतु तें त्यांचें हाक मारणें शुद्धींतलें नव्हतें. अर्थात्च तिला उत्तरही कांहीं मिळालें नाहीं. तेव्हां जी काय रतिमात्र आशा उभी राहिली होती, ती पार कोणीकडच्या कोणीकडे मावळून वहिनीबाई पुनः अत्यंत दुःखाविष्ट झाल्या. मध्यरात्रीची वेळ, इस्पिळांत रोगी व त्यांचे शुश्रूषक मिळून कांहीं नाहीं तरी हजार बाराशें माणसें होतीं. त्यांपैकीं गाढ निजलेलीं अशीं थोडींच. आणि कित्येक मोठमोठ्यानें व वायूच्या लहरींत वाटतील तशा आरोळ्या किंकाळ्या मारणाऱ्या रोग्यांचें वेडेंवांकडें विवळणें व भयंकर किंकाळ्या इतक्या सुरू होत्या कीं, कांहीं बेसुमार ! परंतु त्या कश्शाकडे सुद्धां तिचें लक्ष्य गेलें नाहीं. तिच्या नौकरांपैकीं दोघांतिघांनीं तिला " बाईसाहेब, आपल्याला फार दगदग पडते. आपण अंमळ निजा. मी बसतों, " असें म्हटलें; परंतु ती ऐकेना. कशी ऐकणार ? तिला अगदीं स्वाभाविकपणेंच एकदम कळून चुकलें कीं, आपला नवरा आपल्याला सोडून जाणार. तेव्हां जितकी त्याची शुश्रूषा आपल्या हातून होईल तितकी करावी. थोड्या वेळानें तिनें तंबूतून आपले सगळे नौकर बाहेर घालविले आणि दोघांना त्यावेळीं छोटूला घेऊन येण्याबद्दल त्रिंबकरावास निरोप सांगण्यास पाठविलें. "पोरगा तो हवा कशाला ? शेवटीं जर जवळ बसायला नाहीं तर हवा कशाला ? " असें ती आपल्याशींच पुटपुटली.

आणखी दोन अडीच तास गेले. तोंपर्यंत ती एकटी त्या आपल्या क्षणोक्षणीं चार चार पावलांनीं जणूं काय इहलोक सोडून दूर चाललेल्या पतीकडे आपल्या आतां अश्रु संपल्यामुळेंच केवळ अश्रुहीन झालेल्या नेत्रांनीं पहात त्याच्या कपाळावर हात ठेवून आपल्या सद्गदित झालेल्या कंठानें परमेश्वराचा एकसारखा धांवा करीत होती. होतां होतां एकाकीं त्यांच्या कपाळास घाम आल्याचें तिला समजलें आणि एकदम तिला वाटलें कीं, आतां घाम सुरू झाला, तेव्हां ताप उतरणार. या विचारानें तिच्या निराश मनाला किंचित् आशा आणली. आणि अधिक लवकर घाम यावा म्हणून तिनें त्याच्या अंगावर आणखी एक पांघरूण घालण्यासाठीं जवळचें ब्लांकिट उचललें. अरेरे ! तिला बिचारीला काय ठाऊक, कीं हा घाम म्हणजे काळघाम ! हा, ताप उतरूनच नव्हे, तर अंगांतला सगळा जीवोष्माच नाहींसा करून सर्वच थंड पाडावयाचा ! जवळ जवळ पाव तास झाला. ती हीच आशा धरून बसली होती कीं, या घामानें ताप उतरेल. पाव तासानें तिनें घाम कितपत येतो आहे तें पहाण्यासाठीं पांघरुणाच्या खालीं हात घालून त्यांचा हात चापसून पाहिला, तों तो किती गार ! त्याबरोबर मात्र ती पूर्वीपेक्षां दसपट अधिक घाबरली. आणि हाताप्रमाणेंच पायाची व इतर अंगाची स्थिति आहे कीं काय, हें पहाण्यासाठीं म्हणून तिनें पोट वगैरे चापसून पाहिलें, तों अगदीं काल्याप्रमाणें थंडगार ! मग काय ? इतक्यांत छोटूला घेऊन त्रिंबकराव आंत आले. त्यांची चाहूल लागतांच तिनें वर पाहिलें आणि एकदम पुढें जाऊन त्याच्या गळयाला मिठी मारून मोठ्यानें रडून म्हणाली, " बाळा, नाहीं रे नाहीं आतां आपल्याला लाभत...तरी मी म्हणत होतें, कीं आपण बाहेर जाऊं. ...पण...पण... " ती एकदम थांबली. तिला वाटलें आपल्या नवऱ्यानें आपल्यास हांक मारली. विलक्षण चर्येनें तिनें त्यांच्याकडे क्षणमात्र पाहिलें, आणि त्यांच्याजवळ जाऊन " काय ? काय ? "

असें त्यांला म्हणूं लागली, पण कांहीं नाहीं. ते हात मात्र हलवीत होते. आणि आतां त्यांचे डोळे उघडले होते. ते खरोखर या वेळीं शुद्धीवर आले होते. वहिनीबाईनीं छोटूला त्यांच्याजवळ नेलें आणि “ बस. बस. उशाशीं बस, ” असें म्हटलें.

ही दुसऱ्या बाजूस उभी राहिली. आणि वांकून जणूं काय त्या क्षणोंक्षणीं निस्तेज होत जाणाऱ्या नेत्रांच्या बुबुळांवर अगदीं अंधुक अंधुक अशा अक्षरांनीं त्यांनीं आपली इच्छाच लिहिवली होती ती, ती वाचण्यांत मग्न झाली होती. तोंडानें परमेश्वराचा धांवा चालूच होता आणि डोळयांतून एकसारखे अश्रु त्यांच्या त्या पिंवळट होत चाललेल्या मुखावर पडत होते. आणि सुमारें दीड मिनिटाच्या आंतच जणूं काय त्या अश्रूंच्या शिंपडण्यानें दादासाहेबांच्या मनांत चाललेली तळ-तळ शांत होऊन ती अगदीं मंदतेज जीवज्योति त्या तिला प्रियतम अशा शरीरांतून निघून गेली.

सुमारें पांच मिनिटें तो तसा प्रकार झाला हें तिच्या लक्षांत सुद्धां आलें नाहीं. ती तशीच्या तशी एखाद्या मूर्तीप्रमाणें उभी होती. नंतर तिच्या लक्ष्यांत खरी स्थिति काय ती आली. आणि एकाएकीं वाऱ्यानें किंवा धरणीकंपानें जशी केळ अचानक उलथून पडावी तशी ती जमि-नीवर धाडदिशीं पडली.

ती तशी पडली हेंच एका दृष्टीनें बरें झालें. त्यामुळें तितका वेळ तरी तिला त्या असह्य दुःखोद्वेगापासून सुटका मिळाली.

* * * *

वहिनीबाई शुद्धीवर आली. तिनें इकडे तिकडे पाहिलें. आपण कोण, कोठें आहों, याची तिनें जणूं काय आपल्याशींच शहानिशा केली आणि तो झालेला सर्व दुःखद प्रकार अगदीं खरा, तें स्वप्न नव्हे, असें जेव्हां तिला पक्कें कळलें, तेव्हां ती पुनः अतोनात आक्रोश करूं

लागली. तितक्यांत तिची नजर समोरच्या बाजूस रडत बसलेल्या व गड्यांनीं समजाविण्याचा प्रयत्न चालविलेल्या छोटूकडे गेली आणि एकदम त्याला कौटाळून पोटाशीं धरण्यासाठीं म्हणून आपल्या जागची उठून त्याच्याकडे धांव घेण्याचा तिनें प्रयत्न केला. परंतु जमिनीपासून एक हातभर तिनें आपलें अंग उचललें असेल नसेल, तों तिला एकदम पुनः चक्कर आली आणि ती मागें पडली. यावेळीं तिला शुद्धीवर येण्याला फार अवकाश लागला नाहीं. ती लागलीच शुद्धीवर आली आणि अगदीं एकदम तिला कळून चुकलें कीं, आपणही नवऱ्याच्या मागोमाग जाणार. पतीच्या आधीं मरण येणें हें आह्मां हिंदूंच्या बायकांच्या दृष्टीनें सौभाग्याचें—व दैववानपणाचें मोठें लक्षण तें यावें हीच त्यांची मोठी महत्त्वाकांक्षा—त्यांतच आपली कृतार्थता त्यांस वाटते आणि तें जर साहजिकपणें न आलें तर मृतपतीबरोबर त्या सहगमन करून सुद्धां सतीत्व मिळविण्यास पाहत असतात. आपण लवकरच पतीच्या मागोमाग जाणार—असें मनास वाटलें मात्र आणि वहिनीबाईस त्या तशा स्थितींतही आनंद झालासें तिच्या चर्येकडे पहाणारास सहज वाटलें असतें. आतांपर्यंत तिच्या मुखावर जो शोकक्षोभ दिसत होता, तो जाऊन त्याच्या जागीं अद्वितीय शांतता आली. सुमारें चार वाजण्याची वेळ झाली होती, तितक्या त्यावेळीं तिनें त्रिंबकरावास व आपल्या एका नौकरास हांका मारून " आतांच्या आतां गंगाबाईस घेऊन या " असें सांगितलें. आणि छोटूसुद्धां सगळ्यांना बाहेर जाण्यास लावून त्या स्वस्थ पडल्या. मग त्यांच्या मनांत काय चाललें असेल आणि काय नाहीं कोणास ठाऊक ! गंगाबाई येण्यास जितका वेळ लागला, तितका वेळ त्या अगदीं तशा—आपल्या पतीच्या शवाशेजारीं कुशीवर पडून एका हाताचें कोपर बिछान्यावर टेकून तो हात उभा करून त्याच्या तळहातावर गाल ठेवून व दुसरा शवाच्या उरःप्रदेशावर टाकून पडल्या होत्या. जणूं काय त्याचें अनुगमन

करण्यासाठीं मनास अतिनिश्चय शिकवून त्या तयारीच करीत होत्या. तितक्या वेळांत त्यांनीं डोळे उघडले नाहींत. अश्रूचा एक बिंदूही गाळला नाहीं. चर्या अतिशय शांत—जणूं काय आत्यंतिक शांति प्राप्त झालेल्या साधूप्रमाणें शांत—दिसत होती.

पूर्वेस तांबडें फुटण्याची वेळ आली, इतक्यांत गंगाबाई—जी छोटूला घेऊन त्रिंबकराव गेल्या वेळेपासून अगदीं अस्वस्थ होऊन दारांतच बातमीची वाट पहात बसली होती, ती—तेथें येऊन पोंहोंचली. त्याबरोबर छोटूनें धांवत जाऊन "मामी! मामी! आई असं कां करते? बाबा निजलेच आहेत अजून म्हणून होय?" असें म्हणत तिच्या कमरेस मिठी मारली. गड्यांच्या व आपल्या नवऱ्याच्या अगदीं विषण्ण झालेल्या चेहऱ्यावरून तिनें तेव्हांच खरी स्थिति जाणली आणि छोटूस उचलून कडेवर घेऊन ती पटकन् आंत गेली. तों गंगाबाईनें तिची चाहूल ओळखून "गंगाबाई! तुम्ही गर्भारशा आम्हांपुढें येऊं नका. गर्भारशा बायकांना याची बाधा लवकर होते असं मीं ऐकलं आहे. मी तुम्हाला बोलावणार नव्हतेंच, पण मला छोटूला तुमच्या हातीं निरविल्याखेरीज जातां येईना—जीव गुटमळेलसं वाटलं म्हणून तुम्हाला बोलावलं." हें असें काय बोलतां वगैरे कांहीं तरी बोलण्याचा गंगाबाईचा हेतु दिसतांच तिनें हातानें तीस न बोलण्याविषयीं सुचवून ती शांतपणें पुढें म्हणाली, "गंगाबाई, हा छोटू आतां तुमचा मुलगा—माझा नाहीं. याला मीं सर्वस्वीं तुमच्या ओटीत घातला. छोटू, याच तुझी आई बरं आतां. आतांपासून त्यांना आई म्हण. मामी म्हणूं नकोस. जसे हे तशीच मी आतां तुला अंतरलें. गंगाबाई, अगदीं रडूं नका. मी पहा रडतें आहे का? अहो, या दिवसांत असं मरण कुठलं यायला? सती जातां येत नाहीं म्हणून तर देवानं मलाही पण ह्याच रोगानें मरण देण्याचें···" परंतु तितक्यांत तिचा शब्द फार क्षीण झाला व खोल गेला. तरी तिनें हातांनीं कांहीं खुणा करीत

तोंडानें " राम ! राम ! राम " असा त्रिवार उच्चार करून सतीत्व मिळविलें. त्या मुखावरलें जीवज्योतीचें तेज गेलें, परंतु आत्यंतिक अशा परमार्थाच्या प्राप्तीनें येणारें तेज त्यावर झळकूं लागलें. जें अत्यंत दुर्लभ मरण मोठमोठ्या पतिव्रतांना मिळालें नाहीं, तें आपल्याला मिळालें हें मनांत येऊन तिला पराकाष्टेचा अंतरानंद झाला असावा, असें ज्याच्यावर मृत्यूची मुळींसुद्धां कळा आली नाहीं अशा त्या टवटवीत मुखावरून दिसलें. ती आपल्या नवऱ्याची शुश्रूषा करीत असतां असतांच तिला त्या रोगाच्या अनेक प्रकारांपैकीं एका विशिष्ट प्रकारानें पछाडलें होतें. जोंपर्यंत नवरा जगेल अशी आशा होती, तोंपर्यंत तिची इच्छा त्या रोगाला जिंकून बसली होती. परंतु त्या आशातंतूचा जबरदस्त आधार नाहींसा होतांच त्याचा जय होऊन शेवटीं तिचा नव्हे, तिच्या देहाचा मात्र बळी घेतला असेंच म्हटलें पाहिजे. कारण शेवटपर्यंत तिच्या मनावर किंवा बुद्धीवर तिचा तिचाच ताबा होता.

---

# प्रकरण ७ वें.

## प्लेगचा कहर.

आणखी सुमारें वीस दिवस गेले. ह्या वीस दिवसांत शहराची फार भयंकर स्थिति झाली. परमेश्वरानें आपली पूर्ण अवकृपा त्यावर केली आहे, असें ज्यास त्यास वाटूं लागलें. दादासाहेबांच्या व त्यांच्या पत्नीचा काळ झाला त्यावेळीं रोजची मृत्युसंख्या रोज शंभराच्या सुमारास होती, ती आतां दीडशेंच्या घराला आली. पावसानें तर पुराच आ वासला. जेवढ्या लोकांना म्हणून बाहेर जाणें शक्य होतें, तेवढे लोक गांव सोडून गेलेच होते.

भर दोनप्रहरीं सूर्याचें टळटळीत ऊन पडलें असतां सर्व शहर अरबी गोष्टींतल्या मृतनगराप्रमाणें दिसूं लागलें होतें. जिकडे जावें तिकडे घरें बंद. त्यावर वेड्यावांकड्या लोखंडी पट्या ठोकलेल्या आणि दारांवर " हें घर बंद केलें आहे " " हें घर उघडतां कामा नये " अशा अर्थाचीं इंग्रजी लेबलें चिकटविलेलीं दिसत. ज्या ठिकाणीं पन्नास पन्नास माणसें असावयाचीं, तेथें चिटूपाखरूं सुद्धां नाहीं. सर्व शहर इतकें भयाण व उदास दिसे कीं, जणूं काय मृत्यूनें अत्यंत प्रचंड अशा गिधाडाचें रूप घेऊन आपले प्रचंड पंख शहरावर पसरून त्यावर झडप घालून आपल्या भयंकर नखांनीं त्याचें नरडें दाबल्याकारणानें त्याचा श्वासोच्छ्वासच बंद झाला आहे, एक सुद्धां नाडी हलत नाहीं, असा भास होई. भर दुपारीं कित्येक पेठांतून व रस्त्यांतून जातेवेळीं मन कचरून शरीर थरारे. एखादें वळण घेतलें नाहीं तों दोन प्रेतें. मागें पहावें तों आणखी दोन. त्यांना वाट देण्यासाठीं म्हणून एखाद्या घराच्या पाख्याखालीं जरा उभें राहण्यास जावें तों आंतली रडारड कानावर आलीच. निदान थोड्या वेळापूर्वींच नेलेल्या प्रेताचीं कडबा, सूप, जोंधळे वगैरे चिन्हें नजरेस आलींच. शिवाय दूरदूर चाललेल्या प्रेतांचें " राम बोलो, भाई राम ! " कानांत शिरून अंतःकरणाला कापवी तें निराळेंच! एका रस्त्याला पांच सात घरांपुढें तरी कपडे जाळून त्यांवर लोशन टाकलेलें आणि घरांत जिकडे तिकडे पिचकाऱ्या मारून परक्लोराईड ऑफ मर्क्युरीच्या पाण्यानें सगळें धुऊन काढलेलें. घरांतलें सर्व सामान कोठें अंगणांत, कोठें गच्चीवर, छपरावर अगर रस्त्यांत पसरलेलें. कोठें सेग्रिगेशन चुकण्यासाठीं व्हालंटिअरसाहेबांच्या विनवण्या व त्यांचीं अधिकाराचें अस्तित्व दाखविणारीं उत्तरें ऐकूं येताहेत. कोठें " दादा, आजचा दिवस कळवूं नका. माझ्या बाब्याला आजच सकाळीं ताप आला. आतां त्याला बरं वाटतं आहे. तो उद्यांला बरा होईल बगा, अन्

आजच त्याला नेलात तर—माला रंडकीला तेवढाच मुलगा आहे तेवढा तरी राहूं द्या, ” असे अतिशय केंविलवाणे शब्द ऐकूं येत. मधून मधून पुढें एक टांगा, त्यांत एक नोटबही घेतलेला इसम, एक फेनाईल भरलेली जस्ती झारी व टुवाल घेतलेला पोरगा, आणि मागें एका गाडींत आंत गोरे डाक्तर व वर कोचबॉक्सवर एक पोलिसचा शिपाई, असा लवाजमा सकाळीं ७ वाजल्यापासून दुपारीं १२ व पुनः २ वाजल्यापासून रात्रीं ११ पर्यंत धडधड खडखड करीत सगळया शहरभर हिंडतांना दृष्टीस पडतच. त्यांच्याजवळ ‘ अमकें इस्पितळ, ’ ‘ तमकें इस्पितळ, ’ याखेरीज दुसरें भाषणच नाहीं. त्याचप्रमाणें सकाळपासून दहा अकरापर्यंत व पुनः दुपारीं तीन पासून सात वाजेपर्यंत आजाऱ्याची शिकार साधणाऱ्या व्हालंटिअरांचा सुळसुळाट चाललेला असेच. ते आपल्या दृष्टीनें खरोखर जिवाकडेही न पाहतां केवळ लोकांची सेवा घडावी म्हणून अहोरात्र खपत, परंतु लोकांना, रोग्यास नेणें, रोगी सांपडेल तें घर सफाई धुऊन टाकणें आणि शेवटीं त्या घरांतल्या अगर कुटुंबांतल्या माणसांना बाहेर हाकवून देणें, हे उपाय अत्यंत तिरस्कार उत्पन्न करणारे; तेव्हां त्याच उपायांची अंमलबजावणी करणाऱ्यांबद्दल त्यांना चांगलें कसें वाटणार! त्यांच्याकडून तोंडावर जरी स्तुति झाली, तरी मागें शिव्या व्हालंटिअरांस मिळणार हें ते जाणूनच असत. शहरांत केव्हांही कोठेंही हिंडा, जिकडे तिकडे रडारडी, कुरकुरी, मोठ्या दुःखानें घेतलेलें परमेश्वराचें नांव, प्लेग, सेग्रिगेशन, इस्पितळ, छकडा, व्हालंटिअर, या शब्दांखेरीज दुसरें कांहीं कोठें सुद्धां ऐकूं येत नसे; कोठें रोगी चालले आहेत, कोठें प्रेतें चाललीं आहेत, कोठें प्रेतासाठीं छकडे ठरविताहेत, तर कोठें बांबू, मडकीं व कडब्याच्या पेंढ्या चालल्या आहेत. मध्य रात्रीची शांत वेळ, या ओसाड शहरांत तर फार शांत असावी, परंतु ती सुद्धां ‘ राम बोलो भाई राम ! ’ या भयंकर व काळीज थरारून टाकणाऱ्या आरोळ्यांनीं गजबजलेली

असे. जणूं काय जे काय थोडेबहुत लोक शहरांत राहिले असतील त्यांनीं आपलें नश्वरत्व विसरूं नये, केव्हां तुमच्यावर माझी झडप येईल याचा नेम नाहीं, असें सुचविण्याकरितांच यमराज त्या लोकांकडून आरोळ्या मारवीत होता. सारांश, जिकडे म्हणून दृष्टि द्यावी–किंवा ती सहज पडावी तिकडून तिकडून " बाबांनो, हें मानवी जीवित एकंदरींत जितकें नश्वर, त्याच्यापेक्षां शतपट नश्वर आज झालें आहे, अशी सूचना पावलोपावलीं होत असे. गांवांतल्या प्रत्येक माणसाच्या उद्विग्न चर्येवरून हा धडा त्यानें पक्का जाणला आहे असेंच दिसे. आणि सगळ्यांत विशेष उद्विग्नता मनास वाटे, ती याबद्दल कीं, केवळ सदिच्छेनें, लोकांच्या प्राणांचें आपल्या हातून रक्षण व्हावें याच इच्छेनें सरकाराकडून जे उपाय होत, त्या सर्वांना धुताडून–जणूं काय त्या उपायांच्या योजनेनें आपल्याला प्रतिरोध करण्याचा उपक्रम केला आहे म्हणून चिडूनच काय–मृत्युराज रोज दोनशेंपर्यंत बळी घेऊन माझ्या इच्छेपुढें तुम्हां विश्वविजयी इंग्रजांचें तरी कांहीं चालेल असें समजतां काय, असें म्हणून त्यांस सामन्यासच बोलावूं पहात होता. एखाद्या शहरावर सरबत्ती सुरू करून तें सर्व शहर ताब्यांत घेऊन शत्रूनें आपल्या सैन्यास लुटून फस्त करण्याचा हुकूम सोडावा, त्याचप्रमाणें त्या दिवसांत यमराजानें केलें होतें. आपलें प्लेगजंतुरूप सैन्य शहरांत मनमुराद लूट करण्यास सोडलें होतें. त्यांच्या सर्वदाही विषाग्नीवर बिचाऱ्या सोजराच्या पिचकारीचा मारा अगदींच लुळा. ही बाह्य स्थिति झाली. परंतु बाह्यतः जितकी मनुष्याची दुर्बळता दिसून आली, तितकीच अंतर्यामींचीही मनुष्याची दुर्बळता किती असते, हें या परमेश्वरी कोपाच्या दिवसांत फार चांगलें दिसून आलें. मनुष्याचें अंतःकरण स्वभावतः उदात्त नव्हे, तर आपस्वार्थीच होय, या गोष्टीचा अनुभव या प्लेगानें जितका आला तितका कधींच कोणत्या दुसऱ्या मार्गानें आला नसेल. एका घरांत कुटुंबाचीं

दहा माणसें असलीं आणि त्यांतल्या एखाद्याला जर प्लेग झाला, तर सेग्रिगेशन होईल अशा भीतीनें आठांनीं पोबारा करावा आणि एकानें त्या रोग्याजवळ रहावें हें कशाचें द्योतक ? आपल्या घरांत कोणी आजारी पडला असतां त्याच्याबद्दल बातमी फुटूं नये म्हणून कोण खटाटोप ! परंतु शेजाऱ्याचें कोणी माणूस आजारी पडलें असतां त्याची बातमी देऊन आपलें सेग्रिगेशन चुकविण्याची कोण जलदी ! आपल्या घरांत आपलें जिव्हाळ्याचें माणूस आजारी पडल्यास त्याला लपविण्याची जितकी उत्कंठा, त्याच्यापेक्षां दसपट उत्कंठा तितकें तें जिव्हाळ्याचें नसल्यास त्यास घराबाहेर घालवून आपल्या घरांत आजन्मांत तो नव्हता असें दाखविण्याची ! कोणी नौकर आजारी पडला कीं, मध्यरात्रीं त्याच्या कपाळीं इस्पितळ ! गांवांत इस्पितळें असावीं म्हणून सभांतून ओरड, पण जेथें इस्पितळ करावें त्याच्या आजूबाजूच्या लोकांची आमच्या जवळ रोग आणला म्हणून केवढ्या तक्रारी ! घरांत रोगी ठेवण्याची मुभा असावी म्हणून अर्जावर अर्ज, परंतु एखाद्याच्या घरांत रोगी आहे असें समजतांच ती बातमी व्हालंटिअरास पोहोंचविण्याबद्दल केवढी उत्कंठा आणि जिभेची केवढी चळवळ ! नुसती प्रेताची व्यवस्था लावण्यास सुद्धां कोण मारामार ! त्यावेळीं कोणाचा स्नेही कोणास भेटेल तर शपथ !

मनुष्य मात्र आपस्वार्थी, आपली चामडी सुरक्षित रहावी एवढाच काय तो त्याचा हेतु, हा जसा अनुभव आला तसाच हाही पण आला कीं, मनुष्य मनांत घेईल तर देवापेक्षांही देव होईल. अडीअडचणीच्या वेळीं मध्यरात्रीं सुद्धां मदतीस धांवणारे, ओळख नसतां जिव्हाळ्याप्रमाणें झटणारे, शरीरश्रमानें व द्रव्याच्या मदतीनें जर कांहीं कोणाचें बरें होईल तर तें करण्यास मुळीं सुद्धां मागें न घेणारे असेही पण मानवप्राणी असतात, नाहीं असें नाहीं, असाही पण अनुभव आला हें लिहितांना मनाला किती आनंद होतो ! आपलें

कोणी नसतां केवळ एखाद्या आजारी स्नेह्याच्या बरोबर अटेंडंट होऊन जाणारे किंवा आपल्या शक्त्यनुसार जी मदत ज्या कोणास होईल, ती करण्याच्या कामीं कसूर करण्याचें स्वप्नांत सुद्धां न आणणारेही कांहीं लोक असतात, नसतात असें नाहीं. असाही पण दाखला कित्येक ठिकाणीं आला आणि तो विशेषत: गरीब लोकांत! सारांश, मनुष्याचें अत्यंत उदात्त, सामान्य आणि नीच अशीं तीनही रूपें अर्थात् दैविक, मानवी आणि राक्षसी रूपें जर कोठें पाहण्यास सांपडलीं असतील, तर तीं या प्लेगानें मांडलेल्या कहराच्या दिवसांतच सांपडलीं. परंतु आतां आपण हें साधारण वर्णन करण्याचें सोडून देऊन आपल्या प्रस्तुताकडे वळूं.

वीस दिवस होऊन गेले. त्रिंबकरावांच्याजवळ छोटू राहिला. गंगाबाईचा जीव कीं प्राण त्याच्यावर जडला. त्याच्या आईनें त्याला आपल्या स्वाधीन केलें, तर त्याला तिचें विस्मरण पाडणें आपलें जरूर कर्तव्य हें ती जाणून होती, आणि अंतर्यामीं त्याच्याबद्दल तिला प्रेमही वाटे.

त्रिंबकराव या वीस दिवसांत फारच उद्विग्न असत. त्यांचे स्नेही दादासाहेब वारल्याकारणानें हा उद्विग्नपणा आला असावा असें सर्वांस वाटे. खरें कारण काय होतें तें त्यांचें त्यांस किंवा एका परमेश्वरास ठाऊक. या उद्विग्न स्थितींतच ते एकविसावे दिवशीं आपल्या बायकोस म्हणाले, " मीं पांच दिवस झाले, ताईच्या नवऱ्याला पत्र लिहिलें त्यांत तुला बाळंतपणाला तिकडे पाठवितों, इकडे प्लेगचा कहर फार असल्यामुळें आमची फार अडचण आहे," असें लिहिलें. त्यांचें आज पत्र आलें कीं, अगदीं जरूर पाठवावें. तर तूं आज संध्याकाळच्या गाडीनें जा. आपण ज्या हद्दींत आहोंत, त्या हद्दींतले कायदे शहरांतल्या कायद्यांपेक्षां किती तरी भयंकर आहेत. तूं होणार बाळंतीण तेव्हां कोण्या वेळीं काय प्रसंग येतो आणखी काय नाहीं एवढ्याकरितां तूं जा."

गंगाबाईनें त्यांस उत्तर दिलें. “ त्यांचा मुलगा आपल्या इथें असून वारला आणखी आपण आतां कोण्या तोंडानें तिथें जावं ? मी कांहीं जाणार नाहीं. ”

“ नाहीं म्हणजे ? मी सांगतों आणखी नाहीं म्हणजे काय ? तुला गेलंच पाहिजे. मुलगा वारला तो कांहीं अपराध आमचा नाहीं. आणखी अडीअडचणीच्या वेळीं जर उपयोगी पडायची नाहीं, तर मग बहीण तरी करायची काय ? शिवाय तिकडे मी पत्र लिहून त्यांचा जर रुकार आणला आहे, तर आतां तुझी चर्पटपंजरी मी ऐकतों काय ? ”

“ बरं मी जाईन. पण छोटूरायाची काय व्यवस्था ? त्याचं इंथें कोण करील ? त्याला नकोका बरोबर न्यायला ? त्याला पाठवीत असलां, तर मी जातें. माझं काय ? ”

“ त्याला पाठवीत नाहीं. आतां जिथें मी तिथें तो. त्याला मी क्षणभर सुद्धां विसंबणार नाहीं. माझ्या दृष्टीसमोर तो सदोदित पाहिजे. ”

“ मी त्याला टाकून जायची नाहीं. ”

“ मी त्याला तुझ्याबरोबर पाठवणार नाहीं, आणखी तुला घाल-वून देणार. ”

गंगाबाईनीं हट्ट घेतला, त्रागा केला, विनवण्या केल्या, परंतु त्या सर्व व्यर्थ गेल्या. डोळयांतून एकसारखें पाणी गाळीत त्यांना त्या रात्रीं आपल्या नणंदेच्या गांवीं तिच्याकडे जावें लागलें. जातांना तिच्या दृष्टीनें तिला कितीतरी अपशकुन झाले. आपण जातों आहोंत परंतु आपल्यावर कांहीं तरी संकट येणार, आपल्या मागें छोटूस कांहींतरी होणार असें तिच्या मनास वाटून त्या रुखरुखींतच ती गेली. मात्र जातांना तिनें छोटूस घट्ट मिठी मारून “ बाळा, बायकांचा जन्म व्यर्थ

रे व्यर्थ ! तुला मी परमेश्वराच्या स्वाधीन करून जातें, " असें म्हणून ती गेली. बिचारीच्या बरोबर कोणी पोंचविण्यास सुद्धां दिलें नाहीं. स्टेशनावर तिला उतरून घ्यावें म्हणून तार केली होती. ती गेल्या नंतर चार दिवसांनीं छोटूस घेऊन त्रिंबकराव गांवांतल्या घरांत आले होते. तेथें संध्याकाळपर्यंत राहून परत गेले. त्यास ताप आला आहे व सबर्बन हद्दींत बंगल्यांत रोगी आढळल्यास अतोनात त्रास होतो म्हणून त्यास गांवांतल्या घरांतच नेऊन त्याची औषधपाण्याची तजवीज करतों म्हणून तेथल्या मंडळीस त्यांनीं सांगितलें व ' बंगल्यांतले कोणी गांवांत येण्याचें कारण नाहीं, आल्यास उगीच बभ्रा होईल, असें बजावून ते पुनः परत गेले. चवथे दिवशीं सकाळीं ते अतिशय रडवें तोंड करून परत आले व नानाप्रकारचे उपाय केले तरी तो कांहीं शेवटीं जगला नाहीं, रात्रीं नऊ वाजतां वारला. तेव्हां लागलीच जमवाजमव करून त्याचा अंत्यविधि केला असें त्यांनीं सांगितलें. छोटूरायाच्या मरणानें घरच्या नोकरांस अर्थात्च अतोनात वाईट वाटलें. आणखी सुमारें आठ दिवस गेले, दररोज पहावें तों त्रिंबकराव अधिकाधिकच उद्विग्न होत चालले. शेवटीं आठवे दिवशीं त्यांनीं सर्व चाकरनोकरांस एकत्र बोलावून आपले स्नेही, त्यांची साध्वी पत्नी आणि उरलेला मुलगा हीं एका महिन्याच्या आंत वारल्याबद्दल आपल्यास अतिशय शोक झाला आहे, तेव्हां आपण आतां कांहीं दिवस कोठें तरी पर्यटनास जाणार असें म्हणून सर्वांचे पगार देऊन वर कांहींकांहीं रुपये बक्षीस म्हणून दिले, आणि त्यांस रजा दिली. दादासाहेबांचें सर्व सामान त्यांच्या गांवांतील घरांत भरून इतर काय व्यवस्था करावयाची ती करून स्वारी खरोखरीच देशपर्यटनास गेली.

* * * * *

त्रिंबकरावाचें गंगाबाईस बाळंतपणास पाठविण्याबद्दलचें पत्र आलें, तेव्हां त्याच्या बहिणीस वेणूताईस व माधवरावास फार आश्चर्य वाटलें.

त्रिंबकराव आपल्याला आतां कधीं पत्र पाठविणार नाहीं असें त्यांस वाटत होतें. कृष्णास प्लेग होऊन तो वारल्याबद्दलचें पत्र त्रिंबकरावाकडून आलें त्यावर, " असो, आपण आपलेकडून त्याचे संबंधीं पुष्कळ श्रम केले परंतु त्यांत यश आलें नाहीं. परमेश्वराची इच्छा ! " असें उत्तर लिहिलें. तोच पत्रव्यवहार शेवटला असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. पण त्रिंबकरावाचा स्वभाव त्यांस अद्यापि कोठें पुरतेपणीं कळला होता ?

तें पत्र येतांच ' होकार ' ल्याहावा कीं ' नकार ' ल्याहावा याबद्दल त्या कुटुंबांत दोन विरुद्ध एक अशीं मतें पडल्याकारणानें माधवरावास " गंगाबाईस पाठवावें " असेंच सौम्यपणें उत्तर ल्याहावें लागलें. आणि तिला पाठविली आहे, स्टेशनावर अमुक वाजतां उतरेल, तर कोणी घेण्यास पाठवावें अशी उलट तार आली. दुसरे दिवशीं गाडीच्या वेळीं माधवरावाच्या घरचा गडी तिला उतरून घेण्यास गाडी घेऊन गेला. त्याचे बरोबर ती धमनींत बसून निघाली. नणंदेची व आपली दृष्टादृष्ट होतांच काय प्रसंग होईल ? तिचा मुलगा आपलेजवळ ठेवून घेतला असतां तो वारला त्याची काय हकीकत आतां तिला सांगावी ? असे अनेक प्रश्न तिच्या मनांत उभे राहून तिला धमनींतल्या धमनींतच फार हुंदके येऊं लागले; नव्हे ती ओक्साबोक्शीं रडूंही लागली. गाडी हांकणार आपल्याशींच मनांत म्हणतो कीं, हें आहे तरी काय ? होतां होतां खडेबाजारांत एका आडव्या रस्त्याला तिच्या नणंदेचें घर होतें, तेथें ती धमनी उभी राहिली. गंगाबाईनें उतरण्याची वेळ झाली म्हणून आपलें रडें आवरलें व गाडीवाल्यानें दार उघडतांच ती खालीं उतरून दाराकडे पहाते, तों दारांत आपली नणंद व तिच्या शेजारीं—कोण ?—नणंद दुःखीकष्टी होऊन बसलेली असावयाची ती नसून हंसत मुखानें आपल्याकडे पहाते आणि " मामी ! " म्हणून आपल्याला हा कोण बरें हांका मारतो आहे ?

आपण स्वप्नांत तर नाहींना ? आपल्याला भ्रम तर झाला नाहींना ? हा कृष्णाच कीं त्याचें पिशाच्च ? हें आहे तरी काय ? तो देखावा–तो प्रसंग तिच्यानें फार वेळ पहावेना ? तिला चक्कर आल्याप्रमाणें होऊन ती आतां मागें पडणार तोंच “ वहिनी ! वहिनी ! ” “ मामी ! मामी ! ” म्हणून हांका मारीत दोघांनीं तिला दोहींकडून धरली व चटकन् एक आंथरुण उलगडून त्यावर तिला निजविली. तिला शुद्धीवर आणण्यास बराच वेळ लागला. परंतु शुद्धीवर आल्यानंतर, तिनें जें काय पाहिलें तें सर्व खरें असून तिचा भाचा कृष्णा वारला नाहीं, त्याला प्लेग झाला नाहीं, साध्याच तापावर त्याचें दुखणें जाऊन त्यास इस्पितळांत एका भल्या गृहस्थाची मदत मिळून तो दोन दिवसांत बरा झाला; आणि त्याच गृहस्थानें तार केल्यावरून माधवरावांनीं जाऊन त्यास इस्पितळांतून परस्पर इकडे आणलें; हें सर्व कळलें तेव्हां तिला खरोखर किती तरी आनंद झाला ! त्याला इस्पितळांत पाठविण्याच्या वेळीं तिनें मामाशीं किती तंटा केला, परंतु तिचा कसा नाइलाज झाला हें अर्धवट अर्धवट कृष्णानें ऐकलें होतें. तें आपल्या आईला व बापाला त्यानें सांगितलेंच होतें. तेव्हां त्रिंबकरावाबद्दल कितीही जरी कोणाला राग आला असला, तरी गंगा-बाईबद्दल कधींही त्यांना राग वाटला नाहीं. उलट गंगाबाईला बाळं-तपणास येथें आणल्यास तिला सुखच होईल असें त्यांस वाटून त्यांनीं त्रिंबकरावास तिला पाठवून देण्याविषयीं लिहिलें होतें.

परंतु कृष्णा जिवंत चांगला सुखरूप असा पाहून तिला जें समाधान व जो आनंद झाला, तो फार दिवस टिकला नाहीं. ती बेळगांवास आल्या दिवसापासून पुढें आठ दिवस झाले, तरी नवऱ्याकडून कांहीं पत्र नाहीं आणि छोटूचा समाचार कळला नाहीं, यामुळें तिला अतोनात काळजी लागली. तिनें मुकाट्यानें कृष्णाकडून पत्रें लिहविलीं परंतु आणखी पंधरा वीस दिवस झाले, तरी पत्ता नाहीं. शेवटीं ती निराश होऊन

माधवरावाकडून दुसऱ्या कोणास तरी पत्र लिहविणार, तों एके दिवशीं दुपारीं त्रिंबकरावांचें पत्र आलें. त्यांत शेवटीं अमुक दिवशीं छोटूलाही प्लेग होऊन तो तिसरे दिवशीं वारला, यामुळें आपण अतिशय उद्विग्न होऊन चाकरी सोडून महिना दोन महिने हिंडण्यासाठीं म्हणून निघून गेलों आहों असें लिहिलें होतें. आणखी कांहीं सुद्धां नव्हतें. आणि अमुक ठिकाणीं गेलों आहोंत किंवा जाणार आहों हेंही कांहीं नव्हतें. टपालाच्या छापावरून समजावें, तर तेंही शक्य नव्हतें. कारण पत्र कोठें तरी रेल्वेंत टाकलें होतें.

बिचाऱ्या गंगाबाईस " ही छोटूच्या मरणाची बातमी कृष्णाच्या मृत्यूप्रमाणेंच खोटी नसेलना ? " अशी शंका क्षणमात्र आली, परंतु ती फार वेळ न राहतां तिला अतोनात दुःख झालें आणि वहिनीबाईंनीं आपल्या स्वाधीन त्यास केलें, तेव्हांचें त्यांचें भाषण तिच्या कानांत घुमूं लागून व तो सर्व देखावा एकसारखा तिच्या नजरेसमोर रेखल्या-प्रमाणें उभा राहिला ! त्या शोकस्थितींतच पुढें ती बाळंत झाली व तिला एक मुलगी झाली.

---

## प्रकरण ८ वें.

### त्रिंबकराव परत आले.

मनुष्य प्राणी जीव घेणाऱ्या किंवा शरीरास त्रास देणाऱ्या संकटा-पासून दूर दूर पळतो, तसा आपल्या कित्येक विचारांपासून त्रास होऊं लागला, तर त्यांच्याहीपासून पळूं पहातो. त्याचें मन त्याला दूर सारतां येत नाहीं, अर्थातच त्याच्यांत उत्पन्न होणारे विचारही दूर होत नाहींत. परंतु अशा वेळीं तो आपलें मन त्या विचारांपासून अलिप्त राहण्यासाठीं दुसरेंच कांहीं व्यवसाय काढून त्यांत आपलें तें मन

व्यापृत होईल असें करण्यासाठीं एकसारखा धडपड करीत असतो. त्याचप्रमाणें फार शोक झाला असतां, ज्या स्थानीं तीं शोककारणें झालीं असतील, त्या स्थानाचा त्याग करून चार दिवस दुसऱ्या कोठल्या स्थानाला जातो. त्रिंबकराव कोणच्या हेतूनें बाहेर गांवीं पर्यटन करण्यास गेले असतील, तें कांहींच सांगतां येत नाहीं. ते मात्र ज्याला त्याला "आपले जीवश्च कंठश्च स्नेही, त्यांची पत्नी व त्यांनीं आपल्या हातीं दिलेला मुलगा, सर्वच त्या दुष्ट प्लेगानें आपल्या देखत नेलीं, तेव्हां आपण आतां येथें राहण्यांत काय अर्थ आहे? गांव सोडून कांहीं दिवस तरी जावें असें मनांत आणलें आहे," असें सांगत असत. परंतु त्यांस कुठेंही कांहीं केल्या चैन पडेना. येथून तेथें तेथून तेथें असें एकसारखें चाललें होतें. कोठेंही गेले तरी दोन दिवसांवर कांहीं ते राहिले नाहींत. दोन दिवस कोठेंही झाले, कीं त्या जागेचा नवेपणा नाहींसा होऊन व अर्थातच त्यांचें मन व्यापृत करण्याचा तिचा गुणही नाहींसा होऊन पुनः त्यांत पूर्वींचे त्यांचे दुःखविचार त्यांस त्रास देऊं लागत. जवळ जवळ पंधरा दिवस याप्रमाणें स्वारी एकसारखी हिंडत चालली होती. तरी परत जाण्याची त्यांस इच्छा होईना. एके दिवशीं तर एके गांवीं त्यांच्या मनाची फारच वाईट स्थिति झाली असावी असें दिसलें. कारण ते रोजच्यापेक्षांही अतोनात उद्विग्न झाले होते. इतके कीं, त्या उद्विग्नतेला घालविण्यासाठीं म्हणूनच काय त्यांनीं कागद, दऊत, लेखणी घेऊन कांहीं तरी लिहिण्यास प्रारंभ केला. भराभरा दोन ताव त्यांनीं खरडले—त्या खरडण्यानें त्यांच्या मनाला किंचिन्मात्र समाधान झालेंसें दिसलें. त्यांच्या मनांत आणखीही लिहिण्याचें असावें असें दिसलें, परंतु तितक्यांत कांहीं तरी निराळाच विचार मनांत येऊन त्यांनीं ते कागद आपल्या दप्तरांत गुंडाळून ठेवले. आणि दुसऱ्याच गाडीनें ते तेथून चालते झाले.

अशा तऱ्हेनें फिरतां फिरतां आणखी पंधरा दिवस झाले. त्यांच्या त्या हिंडण्याचा परिणाम असो, कीं आणखी केवळ काळाचा प्रभाव असो. त्यांची चर्या तितकी उद्विग्न दिसेनाशी झाली. काळाचा प्रभाव मुळीं असाच आहे कीं, दुःख, भीति किंवा आणखी कित्येक विकार कितीही जबर असोत, आपल्या गतीच्या तडाक्यांत तो त्यांचें निर्मूलन करतोच करतो. निदान त्यांचा तीक्ष्णपणा असतो, तो तरी तो कमी केल्याखेरीज राहत नाहीं, आणि मग अशा स्थितीस आपण मन निर्ढावलें असें म्हणतों. त्रिंबकरावाच्या मनाची तशीच स्थिति झाली होती. त्याच्या दुःखाचा, किंवा कांहीं कारणानें उद्विग्नता आली होती तिचा तीक्ष्णपणा अजिबात जरी नाहीं, तरी थोडासा कमी होऊन त्यांची चर्या आतां निवळली होती. आणखी आठ दिवस गेल्या-नंतर परत आपल्या गांवीं जावें असें त्यांच्या मनांत आलें व आणखी आठ दिवसांनीं परत जाऊन आपल्या पुढल्या कार्याचा उपक्रम करण्या-चेंही त्यांनीं योजिलें. तेव्हां शेवटीं मग ते परत आलेही.

परत आल्यानंतर त्यांनीं गांवांतच आपलें बिऱ्हाड ठेविलें, कारण प्लेग आतां पुष्कळच कमी होत चालला होता. दादासाहेबांचें घर उघडून आंत आपल्याला रहाण्याला परवानगी मिळावी म्हणून खटपट करून त्यांनीं तशी परवानगी मिळविली, आणि ते राहिले. त्या वाड्यांत प्रथम आले, तेव्हां पहिल्यानें दोन दिवस त्यांचें अंतःकरण फार चर्र झालें. दादासाहेब, वहिनीबाई, छोटू या तिघांच्याहीसंबंधानें तीं इथें उभीं आहेत काय? तिथें बसलीं आहेत काय? त्यांपैकीं कोणी बोललें काय? असा भास होऊन ते जिकडे तिकडे कावऱ्याबावऱ्या-प्रमाणें पहात. मधेंच कानोसा घेतल्यासारखें करीत, आणि मग त्यांचें त्यांसच, काय हा आपला वेडगळपणा? तीं माणसें आतां कोठलीं? आतां आपण एकटे या सगळ्याचे मालक होऊन बसलों आहों असें वाटे, आणि ते निर्भयपणें बसत. परंतु तो निर्भयपणा किती

वेळ टिके ? फार थोडा वेळ. रात्रीं आपल्यास सोबत म्हणून त्यांनीं आपल्या तुटपुंज्या ओळखीच्या दोघां चौघांस आग्रह करकरून निजण्यासाठीं बोलाविलें. शिवाय आपल्या ब्राह्मणास व गड्यासमुद्धां अगदीं आपल्या निजण्याच्या जागेंत जवळ निजण्यास सांगावें, परंतु व्यर्थ ! त्या मंडळीला अगदीं डाराडुर झोंपा लागाव्या, परंतु त्रिंबकरावमामास कांहीं केल्या झोंप नाहीं. गेल्या दोन महिन्यांत एकंदर जे जे काय देखावे झाले, ते ते सर्व त्यांच्या नजरेसमोर खेळत होते. कित्येक देखावे तर क्षणभरही डोळ्यांसमोरून हलेनात. त्या तीन मूर्ति तर आळीपाळीनें त्यांच्या नजरेसमोर कायम. शिवाय मधून मधून कृष्णाही त्या आधींच भय उत्पन्न करणाऱ्या देखाव्यांस आपलाही हातभार लावी. बिचाऱ्यास फार तास झोंपेवांचून गेल्याकारणानें अगदीं सहजगत्या एकदां चुटका लागलाच, तरी सुद्धां तो पंधरावीस मिनिटांच्यावर केव्हांही लागेना. पंधरा मिनिटें झालीं नाहींत, तोंच कांहीं तरी भयंकर स्वप्न पडून तो खाडकन् जागा होई आणि एखाद् वेळ किंकाळी सुद्धां फोडी. अगर ‘ नाहीं, नाहीं ’ असें ओरडत उठे. शेवटीं त्यास असें वाटलें कीं, आतां या घरांत राहण्यांत कांहीं तात्पर्यार्थ नाहीं. या घरांत राहिल्यानें आपली प्रकृति मात्र बिघडेल आणि इतक्या सगळ्या खटाटोपाचें फळ उपभोगण्यास आपण फार दिवस जगणार सुद्धां नाहीं. दादासाहेब व वहिनीबाई यांच्या इच्छा कायम राहून तीं पिशाचयोनींत गेलीं आहेत आणि जिवंतपणीं या सर्व वाड्याचा यथास्थित उपभोग घेतां आला नाहीं, तर आतां पिशाचयोनींत जन्म घेऊन तरी तो घ्यावा या हेतूनेंच त्यांना ती योनि प्राप्त झाली असावी. आपल्या ताब्यांत सर्व आलेंच आहे, तेव्हां आपण हें घर विकून टाकून आपल्या सोयीचें दुसरें घेऊं. त्याखेरीज दुसरा उपाय नाहीं. असा विचार करून त्यांनीं खरोखरीच एके दिवशीं ती जागा सोडून दुसऱ्या एका रिकाम्या घरांत दोन माड्या घेतल्या. परंतु बिचाऱ्यास तेथें सुद्धां

त्या दादासाहेबांनीं, वहिनीबाईनीं, कृष्णानें आणि छोटूनें सोडलें नाहीं. त्यांनीं त्याला त्रास द्यायचा तो दिलाच. बिचाऱ्याच्या लक्षांत येईना कीं, हा सर्व आपल्या मनाचा—आंतल्या आंत खाणाऱ्या आपल्या स्वतः-च्या मनाचाच खेळ आहे ! परंतु असें किती दिवस चालणार ? नेह-मींचेंच झाल्यावर तेंही त्यांच्या अंगवळणीं पडलें. आणि त्यांनीं आपल्याला पुढें जें काय करावयाचें, तें करण्यास हळू हळू सुरुवात केली. दादासाहेबांचे ज्यांच्या ज्यांच्याकडे हातावर पैसे होते, त्यांना त्यांना त्यानें पत्रें लिहिलीं व त्यांत असें लिहिलें होतें कीं, दादासाहे-बांनीं मरतेवेळीं मृत्युपत्र करून ठेविलें असून त्यांत मला त्यांच्या मुलाचा ट्रस्टी नेमलें होतें. दुसरी ट्रस्टी बायको होती. आणि शेव-टलें कलम असें आहे कीं, “ हे प्लेगचे दिवस आहेत, न जाणों दुर्दैवानें माझी बायको व मुलगा दोघांसही मृत्यु आला, तर माझ्या सर्व इस्टे-टीचे मालक त्रिंबकराव होत, दुसऱ्या कोणाचाही तिजवर हक्क नाहीं. माझ्या हयातींत माझा व त्यांचा स्नेह फार. आणि त्या स्नेहाचा मला फार उपयोग झाला. शिवाय मरतेवेळीं मला असला भयंकर स्पर्शजन्य रोग झाला असूनही माझ्या मुलास त्यांनीं संभाळलें आणि माझी शुश्रूषा करण्यांत मुळींच आळस केला नाहीं; त्याचप्रमाणें नुसतें ट्रस्टी होण्याबद्दल व माझ्या कृतज्ञतेचें दर्शक म्हणून मी त्यांस कांहीं हजारांची रकम बहाल करीत असतां त्यांनीं ती अगदीं स्वीकारली नाहीं; तेव्हां हा त्यांचा थोरपणा मनांत आणून, माझी सर्व स्थावर-जंगम जिनगी मी अगदीं राजीखुषीनें आणि अक्कलहुशारीनें त्यांस दिली आहे. माझी जिनगी स्वकष्टार्जित आहे, तिजवर दुसऱ्या कोणाचा कोणतेही प्रकारानें हक्क पोहोंचत नाहीं. ” या कलमाप्रमाणें मीच आतां मालक आहें. कारण दादासाहेबांची पत्नी व पुत्र यांसही दुर्दैवानें प्लेगनें मृत्यु आला. करितां ताबडतोब आपलेकडे अमुक रकम येणें आहे, तिचा निकाल करावा. अशीं पत्रें ज्यांना ज्यांना गेलीं त्यांना त्यांना अतो-

नात आश्चर्य वाटलें. आणि यांत कांहीं तरी लुच्चेगिरी असावी- निदान लुच्चेगिरी आहे असें आपल्यास तरी धरण्यास कांहीं हरकत नाहीं; तेव्हां, तुम्ही कोर्टांतून प्रोबेट घ्या, मग रकम देण्याला आमच्याकडून काय हरकत आहे? परंतु आज आपल्या हातीं रकम देऊन पुढें कोणी आणखी एखादा हक्कदार आल्यास लडथड करीत बसण्याचें प्रयोजन आम्हांस दिसत नाहीं; कोर्टानें आपलें वुइल मान्य केलें, कीं दुसरे दिवशीं रकम पावती करतों. रकमेला भय नाहीं. निर्धास्त असावें” अशा अर्थाचींच बहुतेक पत्रें आलीं, तेव्हां त्रिंबक- रावमामांचा जीव अगदीं तडफडला. “लुच्चे लोक! वुइल खरें ठरवून घ्या म्हणतात; एकंदरींत पैसे द्यायला नकोत हा मुद्दा. पण म्हणावं हा मुद्दा कांहीं उपयोगी पडायचा नाहीं. वुइल अगदीं यथा- स्थित जसं असावं तसं सालंकृत आहे. तेव्हां तें खरं ठरण्याबद्दल कोणी सुद्धां शंका घेण्याचं कारण नाहीं. बरं आहे. तितकंही करूं. काय करणार? प्रोबेटला लागणारा स्टांप वांचला तर पहाणार होतों, दुसरं काय? आज लाख दीड लाखाला दोन अडीच हजारांचा तर नुसता स्टांप लागणार. पण तो लुच्चे लोक कुठले वांचूं देणार? भरावा झालं. कोर्टांत जाण्याबरोबर वुइल खरें होणार याबद्दल शंका काय आहे?” असे उद्गार दिवसांतून सतरा वेळ बिचाऱ्यानें काढले असतील. आणि एका ओळखीच्या वकिलाकडे—तो गांवाबाहेर लांब एका बंगल्यांत रहात होता तरी—सतरा हेलपाटे घातले असतील. शेवटीं त्यानें सुद्धां जेव्हां असें सांगितलें कीं, “तुम्ही मुकाट्या करायला जाल, तर त्यांत बूड फार येईल. तुमचं वुइल अगदीं खरं आहे. तेव्हां बेलाशक तुम्ही प्रोबेट—अर्ज करा आणखी वुइलाची शाबिती करून घेऊन भटाभड नोटिसा करा. इस्टेट सगळी तुमच्याच ताब्यांत आहे, तेव्हां तुम्हाला दुसरी कांहीं पंचाईत पडायची नाहीं. अहो, प्रोबेटमध्यें कांहीं कांहीं रकमा लावूं नका. कांहींच्या किंमती

कमी लावा. आणा, मी एकंदर स्टांपाचं खटलं हजारबाराशांत आणून देतों. आमच्या फी—बयाण्याला मात्र त्याचा कांहीं संबंध नाहीं आं ? तो अगदीं..." "हें काय सांगणं वकीलसाहेब, आपल्या बयाण्या-बद्दल काय तक्रार करायची आहे? तें कांहीं नाहीं—मग सकाळीं येतोन् दुसरं काय ?" "सकाळीं नको. आतां रविवारीं या म्हणजे आपण किंमतीबिमतीचा बरोबर मेळ बसवूं आणखी देऊं सोमवारीं अर्ज ठोकून ! त्यांत काय आहे ?" ठरलें ! आणि त्याप्रमाणें रवि-वारीं वकीलसाहेब व त्रिंबकरावमामा बसून त्यांनीं स्टांपाचें लचांड जितकें संपुष्टांत आणतां येणें शक्य झालें, तितकें करून सोमवारीं फी वगैरे भरून स्टांप घेऊन प्रोबेटअर्जी दिली. रीतीप्रमाणें डिस्ट्रिक्ट जज्जानें एक महिन्याची मुदत नेमून त्या वुइलावर कोणाचे आक्षेप असतील, अगर प्रोबेट देऊं नये अशाबद्दल कोणास कारणें दाखविणें असेल, तर अमुक तारखेला कोर्टांत येऊन हजर व्हावें असा जाहिर-नामा लाविला. या मुदतीच्या महिन्यांत त्रिंबकरावमामा यांनीं एकंदर देवघेवीची झडती घेण्याकडे आपला सगळा वेळ खर्च केला. तो स्वतः उत्तम हिशेबी असल्याकारणानें तेव्हांच सर्व वह्या तपासून कोणापासून काय घेणें, कोणाचें काय गहाण वगैरे सर्व त्यांनीं पाहून काढलें; मात्र देण्याचा विचार आपल्यास कांहींच एव्हांशीं कर्तव्य नाहीं असें ठरविलें. आणि कोणी मागणारे आल्यास, यांच्या देणे-दारांनीं यांस जीं उत्तरें दिलीं, तींच उत्तरें त्यांनीं त्यांना दिलीं. या महिन्यांत त्यांनीं दुसरें एक रोजकृत्य केलें तें कोर्टांत जाऊन कोणाक-डून कांहीं हरकत अर्जी आली आहे कीं काय याचा शोध करायचा हें होय आणि तिसरें काम वकिलाच्या घरीं जाऊन दररोज "काय हो ? तुम्हांला कसं काय वाटतं ? मुलाच्या मामानें जर हरकतअर्जी दिली, तर कांहीं होईल असं वाटतं ? त्याचं कांहीं चालेल ? जज्ज-साहेब कसे काय आहेत ?" असे प्रश्न विचारावयाचे आणि त्यांनीं

कधीं " पाहूं आतां कोर्टांत काय होतें तें ! " " त्यांचें काय चालणार आहे? " " वुइल खरें असल्यावर कोणाचें कांहीं चालणार नाहीं. " इत्यादि कधीं आश्वासनपर, कधीं थोडी शंका उत्पन्न करणारीं अशीं उत्तरें द्यावीं. असा प्रकार चालला होता. तो महिना संपण्यास दोन दिवस उरले. तेव्हां त्यांस असें कळलें कीं, छोटूच्या मामानें कोर्टास अर्ज करून वुइलाची नक्कल नेली व ती त्यास मिळाली. त्यामुळें तर त्रिंबकरावास ते दोन दिवस फारच काळजींत गेले. त्यांतलाही एक दिवस गेला. आतां एकच उरला. तोही संपून सकाळ झाली. आतांपर्यंत कोणाची हरकत अर्जी आली नव्हती. अर्थातच मृत्युपत्राची नक्कल नेऊन त्यांत आपलें कांहीं चालावयाचें नाहीं असें पाहून छोटूचा मामा गप्प बसला असें त्रिंबकरावाच्या मनास खात्रीनें वाटलें. मग काय विचारतां? त्रिंबकरावाचें चिंताकृष्णमुख आतां उल्हासरक्त दिसूं लागलें. " मला वाटलंच होतं कीं, कोणी येणार नाहीं. दादासाहेबांचं तर कोणी नाहींच. येऊन जाऊन मुलाचा मामा यायचा, तर भाचाच मेल्यावर मामाला काय तोंड ?– शिवाय मेहुण्यामेहुण्यांचं कुठं चांगलं होतं ? " असे उद्गार वकिलां-पाशीं एक पंचवीस वेळां त्यानें काढले असतील. शेवटीं दहा वाजले. साडेदहा वाजले. अकरा वाजले. हा बिचारा ते दिवशीं आपले एकदोघे कारकून आणखी कांहीं कागदपत्रांचें भिंडोळें घेऊन केव्हांच नऊ साडे नऊ वाजतांच कोर्टांत जाऊन बसला होता. वेळ होतांच जज्जसाहेब आले. त्यांनीं आपलीं किरकोळ कामें काय होतीं तीं उरकलीं. दुसरा एक खटला होता आदले दिवशींचा राहिलेला तो संपविला. त्रिंबकरावानें त्या वेळांत हजार वेळां सभोंवार पाहिलें, आणि पंचवीस वेळां बाहेर जाऊन कोर्टाभोंवतीं हिंडून आला. कोणी हरकत घेण्यास आला असल्यास तो आपल्यास दिसावा हा हेतु. कोणी दिसलें नाहीं. शेवटीं इकडे अर्जाच्या निकालाची वेळ आली,

तेव्हां त्याच्या वकिलांनीं त्यास आंत बोलावलें. त्रिंबकरावाच्या वकिलांनीं त्रिंबकरावाच्या वतीचें म्हणणें सांगून आपल्या अर्जाप्रमाणें प्रोबेट देण्याची कृपा करावी असें प्रार्थिलें. रीतीप्रमाणें त्रिंबकरावाची जबानी घेतली; त्यांत त्यांनीं शपथेवर, दादासाहेब, त्यांची पत्नी व त्यांचा मुलगा हीं तिघेंही वारलीं असें सांगितलें. त्याबद्दल म्युनिसिपालिटींतून आणलेले मृत्यूचे दाखले दिले. वुइलावर साक्षी घालणारांच्या साक्षी घेतल्या. आतां त्यांत कांहीं शंका घेण्यास जागा नाहीं असें वाटतांच जज्जसाहेब प्रोबेट देण्याचें ठरविणार, तोंच घाईघाईनें नुकतेच आंत आलेले एक वकील उठून उभे राहिले आणि त्यांनीं जज्जसाहेबांस असें सांगितलें कीं, मयत मुलाचा मामा या वुइलाच्यासंबंधानें हरकत घेण्यास आला आहे व त्यानें मला वकीलपत्र दिलें आहे. तेव्हां त्याची हरकत अर्जी साहेबांनीं घ्यावी. माझा अशील येथून फार लांब रहात असल्यामुळें त्यास आपल्या जाहीरनाम्याची बातमी लागण्यासच फार दिवस लागले. त्या प्रांतींही प्लेग असल्यामुळें त्यास वाटेंत कारंटाईनही एके ठिकाणीं भोगावें लागलें, तेव्हां उशीर झाला म्हणून अर्ज आज नामंजूर करूं नये. शिवाय या बाबतींत जे कांहीं विलक्षण प्रकार उघडकीस येतील, त्यांवरून आपण अर्ज घेतला हें ठीकच झालें असें आपल्यास वाटेल अशी माझी खात्री आहे. अर्ज करायचा आहे तेव्हां मुदत द्यावी, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. अर्ज सादर करतों, आणि त्यांत दिलेले मुद्दे आतांच्या आतां शाबीत करतों. अर्जदार येथें आतांच हजर आहे. आणि त्याच्या तर्फेचे साक्षीदारही फार लांबून येथें आणले आहेत."

तें ऐकतांच त्रिंबकरावमामाच्या चर्येंत एकदम बदल झाला. त्याचा चेहरा क्षणापूर्वीं जो अतोनात उल्हसित दिसत होता, तो थोडासा काळवंडला. आणि त्यांनीं आपल्या वकिलास, "तुम्ही हरकत करा. अर्ज घेऊं नये. निराळी फिर्याद करावी असें सुचवा,"

असें बोलण्याविषयीं तोंडानें, व हातानें व कोपरखळ्यांनीं सुचविलें. शेवटीं त्या वकिलांनीं तसें कोर्टास सांगितलें. त्यांत ते शेवटीं म्हणाले, " त्या अर्जांत काय असणार तें आपणास उघड दिसतेंच आहे. विनाकारण कोर्टाची वेळ खाण्याचा हा प्रयत्न आहे. प्रत्यक्ष स्वर्गांतून जरी साक्षीदार यांनीं आणले तरी सुद्धां, आमच्या अशिलाला अनुकूल अशीच साक्ष होईल. " त्यावर विरुद्ध पक्षाच्या वकिलानें त्रिंबकरावाकडे व त्यांच्या वकिलाकडे कान्या डोळ्यानें पहात व हंसत त्यांस उद्देशून म्हटलें, " ब्रिटिश कोर्टांत न्याय मिळण्याला स्वर्गांतून साक्षीदार आणण्याची मुळींच जरूर लागत नाहीं. तेथें सदैव न्याय मिळतो, परंतु यावेळीं जर जरूर पडली तर स्वर्गांतून सुद्धां साक्षीदार येऊन साक्ष देतील. "

जज्जसाहेबांनीं लागलीच अर्ज वाचून पाहून मंजूर केला आणि तो वाचून दाखविण्यास शिरस्तेदारास सांगितलें. त्याप्रमाणें तो वाचला गेला. त्याचा सारांश असा होता कीं, ( १ ) हें वुइल सर्वथा खरें नाहीं. ज्या कलमाअन्वयें मूळ अर्जदार प्रोबेट मागतो तें कलम मयतानें सांगितलेलें नव्हतें अशाबद्दल पुरावा आहे. आणि ( २ ) जरी यदाकदाचित् तें कलम खरें आहे असें धरलें, तरी मयताचा खरा वारस खरोखर मेला किंवा नाहीं याबद्दल शंका धरण्यास जागा आहे; अशी शंका घेण्यास चांगलींच कारणें आहेत. कारण, कोणी इसम मेला नसून मेला असें खोटेंच उठविण्याची खोड अर्जदारास आहे याबद्दलही पुरावा आहे.

तो अर्ज ऐकतांच त्रिंबकराव संतापानें अगदीं लालभडक झाला. त्याचें त्यालाच भान राहिलें नाहीं. आणि आपण कोठें उभे आहोंत हें मुळींच ध्यानांत न राहून तो एकदम उसळून म्हणाला, " खोटें आहे, खोटें आहे. याबद्दल मी बेअब्रूची फिर्याद करून तुरुंग भोगायला लावीन तर नांवाचा त्रिंबकराव ! "

विरुद्ध वकिलांनीं शांतपणें हंसत, हंसत " पाहूं आतां कोण तुरुंग भोगणार तें " असें म्हटलें, आणि कोर्टानें चूप चूप करून व " कंटेम्प्ट ऑफ् कोर्ट " म्हणून शिक्षा होईल असें बजावलें. त्रिंबक-रावाच्या वकिलांनींही त्यास तसेंच बजावलें. तेव्हां ते चुप्प बसले.

मयताच्या मुलाचा मामा-हरकतीचा अर्जदार-याची जबानी घेतली. त्यांत त्यानें आपलें काय म्हणणें होतें तें सांगितलें. त्यानें म्हटलें, " माझ्या बहिणीची मला एक तार आली होती, परंतु त्यावेळीं माझ्या घरांत माझी बायको व आई आजारी असल्यामुळें मला तिच्या मद्-तीस येतां आलें नाहीं. मीं आपली स्थिति लिहून एक पत्र पाठविलें. त्याचें मला एक ' दादासाहेब यांजकडून ' अशा सहीचें उत्तरही आलें. त्यांत, ' काळजी करण्याचें कारण नाहीं. मध्यंतरीं प्रकृति बिघडली होती, परंतु आतां आम्ही तिघेंही बरीं आहोंत. बाहेर बंगल्यांत राह-ण्यास गेलों. ' असें लिहिलें होतें. पुढें मी आपल्या विवंचनेंतच असल्यामुळें पुनः बरेंच दिवसांत पत्र वगैरे कांहीं लिहिलें नाहीं. यामुळें मला इकडली हकीकत समजली नाहीं. नंतर सुमारें पंधरा दिवसांपूर्वीं कृष्णराव या नांवाच्या गृहस्थांची तार आली कीं, " आपल्या मयत मेहुण्याच्या इस्टेटीचें काम आहे, करितां सांपडेल त्या गाडीनें निघून यावें. ' म्हणून मी निघून आलों. ज्या कलमावर भिस्त ठेवून त्रिंबकराव इस्टेट मागत आहे, तें कलम दादासाहेबांनीं मुळींच सांगितलें नाहीं असें ते वारले त्यावेळीं त्यांचे जवळ असणाऱ्या एका कारकुनानें सांगि-तलें. त्याच्या साक्षीवरून खरी हकीकत कोर्टास दिसून येईल. "

इतकी साक्ष झाल्यानंतर त्या कारकुनाची साक्ष झाली. तींत त्यानें सांगितलें कीं, दादासाहेबांच्या मरणाच्या आदले दिवशीं त्यांनीं त्रिंब-करावांस बोलवून आणून आपल्या वुइलांत काय काय लिहावयाचें तें सर्व सांगितलें, तेव्हां मी त्यांच्या शेजारींच नाहीं, परंतु कनातीआड उभा होतों. ते काय बोलतात, सांगतात तें ऐकण्याची मला फार

इच्छा झाली. शिवाय दादासाहेबांचा जरी या त्रिंबकरावावर विश्वास होता, तरी हा गृहस्थ भला नव्हे, दादासाहेबांस सपशेल कधीं तरी फसवील असें सर्व कारकुनांस नेहमीं वाटे. सबब सर्व कारकुनांना बाहेर घालविलें, तरी मी आपला बाहेर गेल्यासारखें करून दादासाहेबांच्या उशाच्या बाजूस कनातीजवळ उभा राहिलों व कान देऊन ऐकत होतों. मी शपथेवर सांगतों कीं, त्यांनीं शेवटल्या कलमांतला मजकूर मुळींसुद्धां सांगितला नाहीं. त्यांनीं त्याच दिवशीं तें वुइल लिहून आणण्याविषयीं सांगितलें होतें, परंतु त्रिंबकरावांनीं तें आणलें नाहीं. दुसरे दिवशीं आणलें त्यावेळीं दादासाहेबांची प्रकृति फार बिघडली होती. मला वाटतें ते पक्के शुद्धीवर सुद्धां नसतील. अशा स्थितींत त्यांची सही झाली. साक्षीदारांच्या सह्या केव्हां व कोठें झाल्या मला माहिती नाहीं. त्यांनीं तें मृत्युपत्र पुनः वाचून पाहिलें नाहीं.

उलट पक्षाच्या वकिलानें त्यास "एकून तुम्ही डिटेक्टिवासारखें काम करीत असतां" वगैरे लावून बोलून उलट तपासणीची धडपड केली, परंतु त्यांत कांहीं निष्पन्न झालें नाहीं. त्रिंबकरावाच्या संतापाच्या उद्गारांनीं एकदोन वेळ हंशा मात्र पिकला. नंतर माधवरावांची (त्रिंबकरावांचे मेहुण्याची) साक्ष घेण्यासाठीं त्यांचे नांवाचा पुकारा झाला. कोर्टांत आले, त्याबरोबर त्रिंबकराव गोंधळल्याप्रमाणें होऊन यास आपण एकवार इस्पितळांत पाहिल्याची त्यांस आठवण झाली. आणि हाही त्या कारकुनाच्या साक्षीला दुजोरा देतो कीं काय असें वाटलें, परंतु तसें होण्याचा कांहींच संभव नाहीं, असें वाटून ते काय साक्ष देतात हें पाहूं म्हणून त्यांनीं मिशांवर एकदां दोनदां ताव दिला. तरी मनांत काय चाललें होतें तें त्यांचें त्यांसच ठाऊक!

त्रिंबकरावांचे मेहुणे माधवराव यांच्या साक्षीपासून त्रिंबकरावास कोणी इसम मेल्याची खोटीच बातमी उठविण्याची कशी खोड आहे हें दिसेल. त्यांच्या मुलासंबंधानें म्हणजे त्रिंबकरावांनीं प्रत्यक्ष

आपल्या भाच्यासंबंधानें काय वर्तन केलें आहे तें आम्हांला कळल्या-वरून त्यांस मुद्दाम बोलावून आणलें आहे, असें त्यांच्यातर्फेच्या वकिलांनीं सांगितलेंच होतें. तेव्हां त्याप्रमाणें त्यांनीं सांगितलें. " मी त्रिंबकरावाच्या बहिणीचा नवरा. माझा मुलगा यांचे बायकोनें आपले-जवळ ठेवला होता. त्यास ताप येतांच त्याला यांनीं थोरल्या इस्पितळांत एकटा एका छकड्यांत घालून पाठविला. तेथें एका सज्जन गृहस्थाच्या कृपेनें तो बरा झाला व मी यांस न कळवितां तेथूनच त्यास आपलेकडे घेऊन गेलों. तो मुलगा मेला अशी यांनीं मला खोटीच बातमी दिली होती. त्यांचें हें पत्र" (म्हणून साक्षीदारानें कोर्टापुढें पत्र दिलें.)

" तें पत्र कोर्टापुढें पुरावा म्हणून घेऊं नये. कारण त्याचा प्रस्तुत अर्जाशीं कांहीं संबंध नाहीं. शिवाय आतांपर्यंत झाले असेच बाकीचे साक्षीदार असतील. तेव्हां कोर्टानें विनाकारण आपला अमूल्य वेळ व्यर्थ घालविण्यांत अर्थ नाहीं. एक साक्षीदार आणला त्याला प्रत्यं-तरीं पुरावा नाहीं आणि तो स्वतःच कबूल करतो कीं मी कांहीं तेथें हजर नव्हतों. कनातीच्या आडून चोरून ऐकलें. याला काय ऐकूं येणार ? दुसरा साक्षीदार म्हणतो, मला त्रिंबकरावांनीं खोटी बातमी दिली कीं तुझा मुलगा मेला. अशा बातम्या कितीक वेळां आपण ऐकतों. त्रिंबकराव कळकळीनें इस्पितळांत आपल्या भाचाच्या समा-चारास गेला असतां तेथें कोणीं त्यास तो मेला असें सांगितलें, त्या-वर त्यानें भरंवसा ठेवला आणि मुलाच्या बापास पत्र लिहिलें. त्यांत प्रस्तुत अर्जाला हरकत कशी येते ? सबब हें कोर्टानें बंद करावें, आणि अर्जातली मागणी मंजूर करावी. "

जज्जसाहेबांचा कल त्याच प्रकारचा दिसला. परंतु आणखी एकच साक्षीदार आणि तो फारच महत्त्वाचा आहे. जो मुलगा मयत झाला अशाबद्दल मूळ अर्जदारानें जबानी दिली आहे, तो मुलगा जिवंत आहे, असेंच त्या साक्षीदाराच्या साक्षीनें सिद्ध होणार आहे, असें विरुद्ध

पक्षाच्या वकिलानें हांसून परंतु नम्रपणानें सांगितलें. तेव्हां त्रिंबकराव पुनः विकटपणें हांसले व “आहे तर त्यालाच आणा! पाजी लोक!” असें संतापानें ओरडले. परंतु वकिलानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. शेवटीं त्या साक्षीदाराची जबानी घेण्यास जज्जसाहेबांनीं अनुमोदन दिलें. लागलीच साक्षीदार कृष्णराव यांस कोर्टांत येण्याविषयीं पुकारा झाला.

कृष्णराव कोर्टांत ज्या दारानें आले, तिकडे हा साक्षीदार तरी कोण आणि कोठून आला हें पहाण्यासाठीं त्रिंबकराव अतिशय उत्कंठेनें पहात होता, तों कृष्णराव स्वतः व त्यांनीं हातीं धरलेला छोटासा फार अशक्त असा एक मुलगा दारांतून आंत शिरले. त्यांचे पाठीमागें एक मानभाव पंथाचा गृहस्थ होता. तें पाहतांक्षणींच त्रिंबकराव एकदम वज्र अंगावर पडल्याप्रमाणेंच धडाडकन् खालीं पडले! अर्थात्च कोर्टांत गडबड उडाली आणि त्रिंबकरावास तेथून उचलून दुसऱ्या खोलींत नेलें. ते बेशुद्ध होते. त्यांच्या तरतुदीस त्यांचा मेहुणा गेला.

हें एकंदरं लचांड आहे तरी काय असें जज्जसाहेबांस होऊन त्यांनीं साक्षीदारास पिंजऱ्यांत बोलावलें. त्यांची साक्ष झाली, त्यांत सर्व गोष्टींचा उलगडा झाला. ते म्हणाले, “मी दादासाहेबांचा एक स्नेही; त्यांच्याकडे माझें नेहमीं जाणें येणें असे. ते आजारी पडले असें मला कळलें, तेव्हां त्यांची इस्पितळांत विशेष व्यवस्था करण्याची खटपट मींच केली. त्यांचा मुलगा मी चांगला ओळखतों. दादासाहेबांसारखा थोर व उत्तम व्यवस्थेनें रहाणारा गृहस्थ सुद्धां जेव्हां प्लेगनें लागला, तेव्हां आतां आपण शहरांत राहण्यांत अर्थ नाहीं असें वाटून मीही लागलीच शहराबाहेर झोंपडी घालून राहण्यास गेलों. तेथें जाऊन पांच सात दिवस झाले नव्हते. एके दिवशीं मी हिंडत हिंडत सहज चाललों होतों, तों जवळच मानभावांचा एक मठ दिसला. हे लोक कसे असतात, काय करतात वगैरे पहाण्याची इच्छा होऊन मी सहज त्यांच्या मठाजवळ गेलों. तेथें त्यांच्यांतील मंडळींशीं गोष्टी

बोलत राहिलों, पुष्कळ विचारपूस केली. त्यांच्या एकंदर बोलण्या-चालण्यावरून व सांगितलेल्या माहितीवरून मला ते लोक एकंदरींत चांगले असावेत असें वाटलें. मी त्यांच्या क्यांपांत इकडे तिकडे हिंडत होतों. प्लेग फार झाला म्हणून ते लोक त्या दिवशींच तेथून क्यांप उठवून जाण्याच्या तयारींत होते. मी हिंडतां हिंडतां एका पालांतून माझ्या नांवानें मला कोणीतरी हांक मारली असें वाटलें. हांक मारणारें मूल असावें असें त्याच्या आवाजावरून वाटलें. म्हणून मी आवाज आला तेथें जाऊन पाहिलें तों तो दादासाहेबांचा मुलगा छोटू! त्याला तेथें पाहून मला फार फार आश्चर्य वाटलें! मी त्या मानभावांस ताबडतोब हा मुलगा तुम्हाला कोठून मिळाला म्हणून विचारलें, तेव्हां त्यांनीं मला सरळपणानें सांगितलें कीं, या मुलाच्या कोण्या नातेवाइकानें आम्हांला गांवांत बोलावून नेऊन मुद्दाम दिला. तेव्हां तर मला अधिकच आश्चर्य वाटलें. कोणच्या पेठेंतून, कोणच्या घरांतून दिला याची चौकशी करितां त्या मानभावपंथी गृहस्थांनीं मला दादासाहेबांचें घर दाखविलें व देणाऱ्या गृहस्थाचें त्यांनीं वर्णन केलें. त्यावरून तो गृहस्थ त्रिंबकरावच असावा असें खात्रीनें वाटलें. त्रिंबकरावांनीं त्या मानभावास असें सांगितलें कीं, हा मुलगा माझ्या नातेवाइकाचा मुलगा. याचे आईबाप दोघेही वारले. मी आपला एक गरीब कार-कून, या वाड्याची व्यवस्था पाहून पोट भरतों. मला कांहीं त्याला पोसवणार नाहीं. तुम्ही घेत असलां तर पहा. नाहीं तर मी आपला त्याला एखाद्या मिशनांत पाठवीन. इतकें त्या गृहस्थानें सांगितल्यावर मानभाव महंतास शंका राहण्याचें कारण नव्हतें. मुलगा तसा जागेपणीं येणार नाहीं आणि आरडाओरडा करील व माझी छीः थूः होईल याकरितां त्याला रात्रीं तो झोंपेंत असतां न्या, असेंही त्रिंबकरावांनीं मानभावास सांगितलें व तेंही म्हणणें बरोबर वाटून त्यांनीं त्यास रात्रीं नेलें. मी त्या मुलाची खरी हकीकत सांग-तांच महंतांनीं अगदीं ताबडतोब माझ्या स्वाधीन त्यास केलें. कारण

त्यांस कसें तरी कोणाचें तरी पोर गोटांत घेण्याची मुळींच इच्छा नसते असें त्यांनीं सांगितलें. ख्रिस्ती होण्यापेक्षां आम्हीं नेलेलें बरें असें वाटूनच त्यांनीं त्यास घेतलें होतें. त्रिंबकरावांनीं त्यास अशा तऱ्हेनें मानभावांस देऊन टाकलें, तेव्हां त्यांत कांहीं तरी काळेंबेरें आहे अशी मला शंका आली व बारीक चौकशी करितां जेव्हां मला असें कळलें कीं, छोटू प्लेगनें मेला अशी गांवांतल्या लोकांत बातमी आहे, तेव्हां त्याबद्दल खात्रीच झाली. छोटूला कोणी तरी जर घेऊन जाते, तर त्रिंबकरावांनीं त्याची अर्थात्च चौकशी केली असती, पोलिसांत वर्दी दिली असती, परंतु तसें कांहीं केल्याचें माझ्या कानीं आलें नाहीं. पुढें मीं काय करावें याचा विचार करीत असतां छोटूस ताप आला. इतक्या विचित्रपणें जो पोरगा आपल्या हातीं लागला तो आतां मरतो कीं काय, असें भय वाटलें. म्हणून व माझें पोर जर आजारी पडलें असतें, तर मी त्याची जी काळजी घेतली असती, तीच याची घेईन; दादासाहेबांनीं आपल्या स्नेह्यांपैकीं कोणाच्या मुलावर असा प्रसंग आला असता तर त्यांनींही आपल्या पोराप्रमाणेंच त्याची काळजी घेतली असती, हेंही जाणून मीं त्यास आपल्या झोंपडींतच ठेवून औषधपाणी केलें. त्याच्या मामासही तार करून बोलाविलें व ईश्वरकृपेनें माझ्या व त्यांच्या प्रयत्नांस यश आलें आणि आज त्याला मला येथें घेऊन येतां आलें."

मुख्य जबानी इतक्या मजकुराची झाली. तीवरून व प्रत्यक्ष मुलाला पाहिल्यानंतर जज्जसाहेबांच्या मनांत अर्थातच काय आलें असेल तें वाचकांस वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्याचप्रमाणें कृष्णराव सांगत असलेली हकीकत ऐकून सर्व मंडळींच्या अंगावर शहारे आले, कीं काय झालें तेंही आतां मी सांगत नाहीं. त्रिंबकरावांचे वकील आपलें दप्तर एका बाजूस ठेवून, "काय शिंचा लुच्चा हो! मला असं ठाऊक असतं तर याचं वकीलपत्र सुद्धां घेतलं नसतं" असें आपल्या

व्यवसायबंधूंशीं बोलत राहिले आणि जज्जांनीं त्रिंबकरावाचा अर्ज काढून टाकून त्याच्या एकंदर वर्तनाबद्दल फार कडक टीका करून त्याजवर फौजदारी चालविण्याविषयीं सरकारांत लिहिण्याचें बोलून दाखविलें.

या सर्व कृत्याबद्दल त्रिंबकरावास तुरुंगाची शिक्षा कांहींच नाहीं अशी जबरदस्त शिक्षा परमेश्वरानेंच केली. तो धाड्कन् पडला, तेव्हांच त्यास अर्धांगवायूचा झटका होऊन त्याची जिव्हा पार गेली. डाक्तरांनीं तो आतां बरा होणें शक्य नाहीं, जगेल तितके दिवस जगेल असें ठाम मत दिलें. त्रिंबकरावांचे कागदपत्र पहातां त्यांत एकदोन विलक्षण कागद सांपडले. प्रवास करितां करितां त्यांना एके वेळीं कृतकर्माबद्दल पश्चात्तापाचा झटका येऊन आपल्या कृष्णकारस्थानांचें वर्णन लिहिलें होतें. मी किती नीच, असा प्रारंभ करून त्यांनीं छोटूला मानभावाला दिल्याची, व तो मेला असें केव्हांही सिद्ध करण्यास सांपडावें म्हणून छोटूच्या वयाचाच एक कुळंब्याचा मुलगा मेला होता, त्याचे बापास पैसे देऊन प्रेत घरांत आणलें व तें छोटूचें प्रेत असें सांगून प्लेग–डाक्तराचा पास घेऊन पुढली व्यवस्था लाविली, याबद्दलची हकीकत लिहिली होती. त्या कागदावरून त्रिंबकरावाच्या नीचपणाची कोणास कसलीच शंका राहिली नाहीं.

---

# प्रकरण ९ वें.

## वाचकांस.

वाचक हो, आतां आणखी काय सांगावयाचें आहे ?

Why then a final note prolong ?
Or lengthen out a closing song ?

पण आहे. आतां सांगावयाचें एवढेंच आहे कीं, छोटूच्या मामाच्या अर्जावरून व त्याच्याच इच्छेवरून गंगाबाईस व कृष्णरावांस जज्जसाहेबांनीं

ट्रस्टी नेमलें. छोटू हल्लीं गंगाबाईजवळच आहे आणि प्रत्यक्ष वहिनी-बाईच्या हातून सुद्धां जितक्या उत्तम प्रकारानें त्याचें लालनपालन झालें नसतें, तितक्या उत्तम प्रकारानें त्यांच्या हातून होत आहे. छोटूही तिला आपली आईच समजतो. आणि त्रिंबकरावांची शुश्रूषा करीत असतां गंगाबाईनें जर कांहीं काम सांगितलें, तर तो अगदीं उड्या मारीत जातो. गंगाबाईला जरी त्रिंबकरावानें चांगल्या तऱ्हेनें वागविलें नाहीं तरी ते आहेत, म्हणजे आपलें सौभाग्यसर्वस्व आहे हें पक्कें जाणून, आमच्या स्त्रियांना अगदीं साहजिक अशा भक्तीनें त्या त्यांची शुश्रूषा करीत असतात. आणि अर्धांगवायूनें पूर्णपणानें झपाटलेल्या रोग्याची शुश्रूषा म्हणजे काय करणें नव्हे ?

बरें तर मग, वाचक हो, आतां आपली रजा घेतों. व तसें करतांना मी आपल्या स्वतःसाठीं व तुम्हां सर्वांसाठीं परमेश्वरापासून एक आशीर्वाद मागून घेतों, तो हा कीं, त्यानें आतां पुनः आमच्या या दुर्दैवी देशावर किंवा भूतलावर कोठेंही प्लेग म्हणून पाठवूं नये आणि छोटू व गंगाबाईची मुलगी सुंदरी या दोघांचा त्यांच्या आयांच्या इच्छेप्रमाणें विवाह होऊन, सुंदरीस अष्टपुत्रवती पहाण्याइतकें आयुष्य आपणां सर्वांस द्यावें. इतकें परमेश्वरापाशीं मागून मी ही लहानशी कथा एका इंग्रजी कवयित्रीच्या पुढील शब्दांनीं सर्वांस अर्पण करितों:—

To mine own people; meaning those within
The magic ring of home my kith and kin;
And those with whom my soul delights to dwell
Who walk with me as friends, and wish me well;
And lastly those-a large, unnumbered band,
Unknown to me-who read and understand.

